श्रीमंत होळकरसरकाराकडून ८०० रुपयांचें बक्षीस मिळालेलें.

# संगीत शापसंभ्रम नाटक.

## ( रंगावृत्ति. )

---


गोविंद बल्लाळ देवल,

संगीत मृच्छकटिक, विक्रमोर्वशीय, शारदा, झुंझारराव, दुर्गा, फाल्गुनराव इत्यादि नाटकांचे कर्ते

यांनीं रचिलें


---


पुणें येथें

हरि नारायण गोखले यांनीं आर्यभूषण छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

---

आवृत्ति तिसरी.

---

१९०८ जानेवारी.

---

किंमत १४ आणे.

# प्रस्तावना.

हें **शापसंभ्रम** नांवाचें संगीत नाटक **इंदूरचे महाराज** श्रीमंत **शिवाजीराव** यांच्या रसिकतेचें व औदार्याचें फल होय. सुप्रसिद्ध व सर्वमान्य अशा **बाण** कवीच्या सुरस कादंबरींतील कथानकाच्या आधारानें हें रचिलें आहे. इंदूरस्थ विद्वान् परीक्षकांच्या व महाराजांच्या जसें हें पसंतीस उतरलें, तसेंच महाराष्ट्रीय रसिक जनांच्या आदरास पात्र झालें ह्मणजे मी कृतकृत्य झालों. या नाटकांतील बहुतेक पद्यें संगीतप्रिय लोकांस सहज ह्मणतां यावींत, म्हणून तीं मीं मुद्दाम सर्वांच्या श्रवणपरिचयांतील व आवडीच्या अशा चालींवर रचिलीं आहेत. तथापि एका पद्यास दुसऱ्याही घाली लागतात ; त्या समय व रस मनांत आणून लावणें हें गांनकुशल पात्रावरच सर्वस्वी अवलंबून आहे.

गो. ब. देवल.

# संगीत शापसंभ्रम नाटक.

## अंक १ ला.

### नांदी.

पद्य.

चाल—अष्टमूर्ति परमेश सदाशिव.—धुमाळी.

श्रीनटनायक चिंतुनि आधीं, बलवंता नमितों ॥
दुष्कर कामीं प्रसाद गुरुचा धैर्य मना देतो ॥ ध्रु० ॥
वत्सकुलोद्भवाचित्रभानुचा तनय बाण, त्याची ॥
रचना कादंबरी सुरम्या सीमा काव्याची ॥
संक्षेपें संगीत नाटकीं ती नटवायाची ॥
इच्छा जाणुनि शिवभूपाची तीतें अनुसरतों ॥ १ ॥

पद्य.

चाल—साध्य नसे मुनिकन्या.—दीपचंदी.

वंदी त्या त्रिगुणाला ॥ कवि हा ॥ सकलशिवार्थी, वेद-मयाला ॥ ध्रु० ॥ प्रथम रजातें धारण करितां । निखिल जगाचा होई धाता ॥ सत्त्वगुणानें पालनकर्ता ॥ तैसें संहाराला, स्वीकारी जो ईश तमाला ॥ १ ॥

**सूत्रधार**—पुरे, नाटकारंभीं विघ्नोपशम करणारं ईशस्तवन करतांच ही पहा प्रेमळ सभासदांची चित्तवृत्ति कशी प्रफुल्लित झाली ती ? ( पारिपार्श्वक जातात. नंतर पडद्याकडे पाहून ) मारिषा,—

**मारिष**—( बाहेर येऊन ) हा आलों; काय आज्ञा आहे ?

**सूत्रधार**—आज शिवमोदपर्वणी; ह्मणून हे नाट्यकलाभिज्ञ सर्व रसिकनायक इथें मिळाले आहेत. आणि—

साकी.

कौशिक गोत्रज कवि गोविंदें जें नवनाटक लिहिलें ॥
नाम शापसंभ्रम हें ज्याचें सुरसगुणीं जें पहिलें ॥
तेंचि पहायाची ॥ दिसते उत्कंठा यांची ॥ १ ॥

तर जा, आणि सर्व सिद्धता कर. मित्रा मारिषा, आजच्या प्रसंगीं सर्व कामं अशीं झालीं पाहिजेत कीं, प्रेक्षकांची मनोवृत्ति, दृष्टि आणि श्रवण हीं सारीं नाटकपात्रांच्या आधीन होऊन रहावींत, समजलास ?

**मारिष**—आधीं नाटक उत्तम, त्यांत नटवर्ग कुशल आणि सभासद सहृदय ! इतकी सामग्री असल्यावर आपली इच्छा सहजच पूर्ण होणार आहे.

**सूत्रधार**—हें सर्व जरी अनुकूल असलं, तथापि सुव्यवस्था ही पाहिजेच.

**मारिष**—ती माझ्याकडे लागली. घेतों आज्ञा तर.

**सूत्रधार**—ठीक आहे. ( तो जातो. ) आतां प्रियेकडून या गायनप्रिय सभाजनांचं कांहीं वेळ रंजन करवून नंतर नाटकाला आरंभ करावा. ( पडद्याकडे पाहून ) प्रिये, तुझा नटीचा वेश तयार झाला असल्यास बाहेर ये पाहूं. ( स्वगत ) ही आली पहा. अशी समयज्ञ, बहुगुणी आणि स्वामीकार्यदक्ष पत्नी असल्यावर आणखी काय पाहिजे ! अरे, पण येतां येतां ही मध्येंच कां थांबली बरं ! समजलों. माझी हाक ऐकून ही गडबडीनं इकडे यायला निघाल्यामुळं वेणीवर फुलांचा गजरा घालायला आणि कर्णांवर कमलपुष्पं ठेवायला विसरली. प्रिये, तूं कां थांबलीस हें मीं जाणलं; परंतु आपल्या भाग्यानं आजचे प्रेक्षक कसे आहेत समजलीस ?

दिंडी.

खरे मार्मिक हे परम रसिक सारे ॥ नसाति नुसतीं व्यंगेंचि शोधणारे ॥ ह्मणुनि येईं राहोत भूषणें तीं ॥ गुणप्रकरा लघु दोष भूषवीती ॥ १ ॥

**नटी**--( पडद्यांतून ) असं असेल तर ही मी आलें महाराज.

**दुसरी स्त्री**--( पडद्यांतून ) गडे, नकोग नको पुढं जाऊं.

**सूत्रधार**—माझी प्रिया यायला सिद्ध असतां तिला ' नको जाऊं ' ह्मणणारी ही कोण वरं विघ्नसंतोषी ! समजलों—

साकी.

अवलोकित मधुमासवनश्री, येत महाश्वेता ही ॥
हंसकन्यका, सवें सखींच्या हांसत बोलत कांहीं ॥
तिजला मैत्रिण ती ॥ सांगे जाउं नको पुढतीं ॥ १ ॥

कदाचित् मला पाहून या पुढं यायला लाजत असतील; तर आपणच इथून जावं ह्मणजे झालं. ( जातो. )

ही प्रस्तावना झाली.

( नंतर पुढें **महाश्वेता**, तिच्या मागून **चतुरिका** आणि **तरलिका** अशा बोलत प्रवेश करितात. )

**चतुरिका**—अग, मी तुला पुढें जाऊं नको ह्मणतेंना ?

**महाश्वेता**—तें कां ?

**चतुरिका**--तो पाहिलास का चंदनाला विळखा घालून बसलेला काळा भुजंग ! पुढें गेलीस तर त्याला सोडून तुला विळखा घालील ह्मणून म्हणतें.

**महाश्वेता**—अहाग वेडे ! चंदनाचा सुवास सोडून तो बिचारा माझ्याकडेग कशाला येईल !

**चतुरिका**—कशाला ह्मणजे ! चंदनापेक्षां तुझ्या अंगाचा घमघमाट फार सुटला आहे ह्मणून.

**महाश्वेता**--वरं, वरं, समजलें हो. चल आतां, त्या वेलींच्या झोंपाळ्यावर बसून दोन गाणीं ह्मणूं.

**चतुरिका**—तरलिके, हे नुसते डोहाळे व्हायला लागले बरंका. गडे महाश्वेते, अशी घाई कां करतेस ? लग्न झाल्यावर जोडप्यानंच बसून गाणीं ह्मणा. आला–आला राग, जसा कांहीं अगदीं ठेवलेला !

**महाश्वेता**—हंग काय तर मग तुझं ? तूं बोलूंच नकोस माझ्याशीं जा. ( चार पावलें पुढें जाऊन ) तरलिके, ती पहा त्या शिलातलावर सर्वगणांसहवर्तमान महेश्वराची मूर्ति दसविली आहे, तिला वंदन करून येतें बरंका.

**तरलिका**—आधींच उशीर झाला आहे; आईसाहेबांचं अंगधुणं सुद्धां आटपलं असेल. त्या रागं भरल्या तर माझ्याकडे कांहीं नाहीं हो.

**चतुरिका**—बरं बरं, भरू देत रागं, मोठी आली आहे सांगायला. ( महाश्वेतेस ) जाग तूं; आणि महेश्वराला असा नवस कर, कीं पार्वतीमातेला जसे आपण, तसाच मला एक भ्रतार मिळावा.

**महाश्वेता**—करीन बरं; तूं नको सांगायला. ( जाऊन वंदन करून प्रदक्षिणा घालूं लागते. )

**चतुरिका**—खरंच; ही आतां चांगली उपवर दिसायला लागली. कोणा भाग्यवानाचं भाग्य उदयाला येतं पहावं.

**तरलिका**—या अशा लावण्याचा भोक्ता कुणी तरी देवलोकींचाच असला पाहिजे. कारण चंद्राची कोर शंकरावांचून दुसऱ्या कुणाला पचणार ! आईसाहेबांनीं एकदां गोष्ट काढली होती; पण कादंबरीचा आणि आपला विवाह अनुरूप पतींशीं एकेच दिवशीं व्हावा, असं हिच्या मनांतून आहे; म्हणून लांबणीवर पडलं बर कोण जाणे.

**महाश्वेता**—( दुरून ) अशा आपल्याशींच काय पुटपुटतां त्या ? मला नाहीं का सांगत ?

**चतुरिका**—पण तुझं आटपलं का ? का वर मिळेपर्यंत गौरीसारखी तूं सुद्धां इथेंच तप करीत बसणार ?

**महाश्वेता**—बरं बरं, पुरे आतां. पण ‘ कादंबरीचा आणि ’ असं कायसंसं बोलत होतां, तें काय ?

**चतुरिका**--दुसरं कांहीं नाहीं. कादंबरीच्या लग्नाचा मुहूर्त ठरला असं ही सांगत होती.

**महाश्वेता**—तसं तर कधीं व्हायचं नाहीं. पण तो लतामंडप पाहिलास ना ! किती गार दिसतो आहे ! मला वाटतं त्यांतच दिवसभर जाऊन बसावं.

**चतुरिका**--महाश्वेते, जरा दम धर; ह्मणजे दिवसभरचसं काय, पण रात्रभर सुद्धां या लतामंडपांत बसायला सांपडेल बरं का. मग इकडे कधीं येशील नें आह्माला कळवायची सुद्धां नाहींस. तुला नाहीं हो, मीं आपलं असंच एका माणसाला ह्मटलं.

**महाश्वेता**-( रागानें ) हेंग काय तुझं ! थट्टा थट्टा ह्मणजे करावी किती भेली ! चला तुमच्या बरोबर बोलतच नाहीं. मी आपली एकटीच मौज पाहीन. ( जाते. )

**चतुरिका**-महाश्वेते, एकटी जातेस, पण संभाळ हो. या वनांत कामदेव फिरत असतो ह्मणून सांगतात. तो तुला रतिच समजून घेऊन गेला, तर आह्मी कांहीं सोडवायला यायच्या नाहींग बाई !

**तरलिका**—अगबाई ! खरंच गेल्या या. चला बाई, त्यांना शोधून काढलं पाहिजे. नाहीं तर त्या एकट्याच जातील आईसाहेबांकडे; ह्मणजे मग झालं. उपवर झालेल्या मुलीला एकटी कशी सोडलीन, ह्मणून आह्मांलाच राग भरून घ्यावं लागेल.

**चतुरिका**—हो, खरंच. तर मग तूं अशी इकडून पहात जा, आणि मी त्या केतकीच्या वनाकडून जातें.

( दोघी जातात. )

**महाश्वेता**—( पुढें येऊन ) काय लबाड तरी ही चतुरिका ! ह्मणे कादंबरीच्या लग्नाचा मुहूर्त ठरला ! आणि ह्मणे या वनांत कामदेव फिरत असतो ! बरंच झालं. पहायला तरी सांपडेल. मला आतां दोघीजणी शोध शोध शोधतील आणि तंवर मी इथली शोभा पाहीन. ( फिरतां फिरतां मध्यें वास घेऊन आनंदानें ) अगबाई !

पद्य. चाल—व्यर्थ अह्मीं अबला-पंजावी.

मधुर किती ॥ कुसुमगंध सुटला ॥ ध्रु० ॥
त्या लोभें हे मधुकर पळती ॥ गुंजारव उठला ॥ १ ॥
सकल फुलांचा परिमल सारा ॥ काय एकवटला ॥ २ ॥
साच असावा सुरलोकींचा ॥ भूवरि हा कुठला ॥ ३ ॥

कुणीकडून येतो बरं हा सुगंध ! हे भ्रमर धांवताहेत, यांच्याच मागून जावं ह्मणजे समजेल. ( जातां जातां एकदम चपापून ) अगबाई ! हे कोण या वनांत ? चतुरिकेनं या वनांत कामदेव फिरत असतो ह्मणून सांगितलं, तो तर नसेलना हा ? ( पाहून ) होय तोच. एकूण मदनासारखा सुंदर या त्रिजगांत कुणी नाहीं ह्मणतात तें खरं. पण एक शंका येते बाई. हा जर काम ह्मणावा, तर शंकरांनीं त्याला जाळून भस्म केला असं ह्मणतात; मग कोण हा ? समजलें—त्याचा मित्र वसंत त्याच्या विरहानं अशा वेषानं वनांत फिरत आहे. पण मी अशी भांबावल्यासारखी काय झालें ! हा इकडेच आला. ( वेली आड होते. **पुंडरीक** बाहेर येतो. )

**पुंडरीक**—आज चतुर्दशी ह्मणून कैलासनाथाच्या पूजनासाठीं माझ्या मित्रासह्वर्तमान मी नंदनवनाजवळून या भूलोकास येत असतां,

पद्य. चाल- ठाउक मजला असे ऋषींचें—धुमाळी.

नंदनवनदेवीनें माझा आदर बहु करुनी ॥ प्रशंसिलें मम रूप किती हें गौरववचनांनीं ॥ १ ॥ कोमल हस्तें नवमांजिरि ही मजला अर्पोनी ॥ वदे करावा प्रसाद, ठेवा भूषण हें कानीं ॥ २ ॥ परिचय नव्हता अशा स्तुतीचा, यास्तव तेथोनी ॥ अधोवदन मी पुढें चाललों लज्जित होवोनी ॥ ३ ॥

नंतर कपिंजलानं ही मंजिरी तिच्यापासून घेऊन मी नको नको ह्मणत असतां, मोठ्या आग्रहानं माझ्या कानावर ठेविली. त्या क्षणा-

पासून माझ्या मनांत कांहीं अपूर्व उत्सुकता उत्पन्न झाली, याचं कारण काय ? ( किंचित् विचार करून ) असो; माझा मित्र पूजेकरितां पुष्पं वेंचित आहे, तोंपर्यंत कधीं न पाहिलेला हा रम्य वनप्रदेश तरी अवलोकन करावा. ( इकडे तिकडे फिरूं लागतो. )

**महाश्वेता**—हा मदनही नव्हे आणि वसंतही नव्हे. त्या दोघांनाही लाजविणारा हा कोणी ऋषिपुत्र दिसतो. देवा! या सर्वांगसुंदराला, अशा वयांत हे वनवासाचे कष्ट कसे आवडत असतील कोण जाणे. ( त्याच्याकडे पहात रहाते. )

**पुंडरीक**—अहाहा ! या वनांत काय सर्वत्र आनंदीआनंद भरून राहिला आहे !

**पद्य. चाल**—अजवरी नृपति बहु झाले–धुमाळी.

मधुमत्त मधुप हे भ्रमती ॥ गुंजारव मंजुळ करिती ॥ मधुप हे ॥ संतुष्ट कोकिला चित्तीं ॥ पंचमस्वनीं या गाती ॥ कोकिला ॥ किती मंद पवन वाहाती ॥ दश दिशा सौरभें भरती ॥ पवन हे ॥ चाल ॥ सदनचि भासे हें मदनाचें ॥ रतिसंगें तो सर्वदां वनीं या वसतो ॥ येथेंचि चाप सजवीतो ॥ मग जर्जर तरुणां करितो ॥ चाल ॥ अति शांत मुनींची वृत्ती ॥ नच राहिल येथें स्थिर ती ॥ १ ॥

एकूण चित्ररथगंधर्वराजानं हें वन निर्माण करून इंद्राच्या नंदनवनाचा उपहास केला, यांत संशय नाहीं. कारण—

**साकी.**

मधुमासाची मूर्तिमती श्री स्वयें वनीं या राहे ॥
नंदनवनशोभा ती हीची, केवळ छाया आहे ॥
ऐसें मज गमतें ॥ हें मन येथें बहु रमतें ॥ १ ॥

**महाश्वेता**—या मनोहर मुनिकुमारावर अशी निश्चल दृष्टि लावणं हें कांहीं चांगलं नव्हे. ( तोंड वळवून ) अगबाई, इकडे सुद्धां

कुमारच दिसतो. ठीकच आहे. एकदां हृदयमंदिरांत शिरल्यावर दृष्टि वळवून काय होणार! इथून जावं ह्मटलं तर हा मार्गावर उभा आहे.. आतां? वरं हा गेल्यावरच जावं ह्मणजे झालं.

**पुंडरीक**—परस्परांच्या ईर्षेनं विस्तार पावणारे हे वृक्ष, आणि यांच्यावर स्वच्छंद आरोहण करणाऱ्या या लतिका पाहून असा भास होतो कीं—

**पद्य. चाल—वसंतीं बघुनि मेनकेला–धुमाळी.**

हे तरु कामीजन असती ॥ करावया वनविहार दारांसह वनिं या येती ॥ पुष्पित लतिका नवयुवती ॥ कोमल शाखाकरीं तयांना आलिंगन देती ॥ स्थळिं या निर्जन एकांतीं ॥ परस्परें चिरविलाससुख हे निर्भय अनुभविती॥१॥

हे तरूच काय, पण येथील पशुपक्षी सुद्धां आपापल्या कामिनींसह आनंदांत निमग्न आहेत. ( पहात फिरतो. )

**महाश्वेता**—इतका वेळ दृष्टिच स्वाधीन नव्हती; आतां तर मन सुद्धां माझ्या अंकित नाहींसं झालं. त्याच्याजवळ जावं, त्याच्याशीं बोलावं असं वाटतं. परवां चतुरिका सांगत होती त्याप्रमाणं ‘हे सगळे मदनाचे तर चाळे नसतीलना! काय वाजलं तें? तरलिका आली वाटतं. ( पहात उभी रहाते. )

**पुंडरीक**—अरे हा काय चमत्कार! हा आम्रवृक्ष आपले शाखाबाहू पसरून ये ये ह्मणून खुणावीत असतां, ही माधवीलता एकदम जाऊन त्याला आलिंगन कां देत नाहीं! समजलों—

**पद्य. चाल--उद्यां बघ जातें–धुमाळी.**

वधू ही वल्ली ॥ मज दिसे संकटीं पडली ॥ ध्रु० ॥ सन्मुख तरुवर हे बहु असती ॥ यांतुनि कोण करावा स्वपती ॥ नाहीं होत सुनिश्चय चित्तीं ॥ अशा या काळीं ॥ पाहिजे सखी कुणि जवळि ॥ १ ॥

आतां ही पुढें काय करते पाहूं बरं. ( पहात उभा राहतो. )

**महाश्वेता**—मदना, हाच कारे तुझा पुरुषार्थ !

**पद्य. चाल** - चलसागर तुह्मी वीरशिरोमणी—धुमाळी.

अनुपम सुंदर ह्मणुनि लोचनीं भरली ही मूर्ती ।
छिद्र पाहुनी हेंच धांवसी कारे मजवरतीं ॥ १ ॥
तयाकडे मन ओढी, अंगें मज उचलुनि धरितीं ॥
धैर्यहि सोडी, अशांत तूंही लोटिशि कां पुढतीं ॥ २ ॥
तनु कांपे ही घर्म दरारे, श्वास उष्ण निघती ॥
अशा संकटीं गांठिशि मजला निंद्य तुझी रीती ॥ ३ ॥

**पुंडरीक**— हिच्या मनाचा तर निश्चय झाल्यासारखा दिसतो. मग अजून कां बरं अनमान करते ! कदाचित् असं असेल.

**पद्य. चाल**—उद्यां बघ जातें—धुमाळी.

वर हा आम्रवृक्ष मनिं भरला ॥ परि तो स्वीकारिल कां मजला ॥ उपजे शंका याची तिजला ॥ अशा या काळीं ॥ पाहिजे सखी कुणि जवळि ॥ १ ॥

एकूण, स्त्रियांचं मन फार शंकाखोर असतं असं ह्मणतात, तें खरं. आतां आपणच हिला सखीच्या स्थानीं होऊन हिचा हात आम्रवृक्षाच्या हातांत द्यावा. ( जवळ जाऊन ) अग वेडे ! अशा प्रसंगीं इतकी लज्जा काय उपयोगीं बरं ! हा पहा तुला आलिंगन देण्यासाठीं बाहू पसरून उभा आहे. ( तिची एक डहाळी घेऊं लागतो. इतक्यांत **महाश्वेता** चटकन् एकीकडे होऊन उभी रहाते. तिच्याकडे आश्चर्ययुक्त प्रसन्न मुद्रेनें पहात रहातो. )

**महाश्वेता**—( आनंदानें ) हें मीं काय ऐकलं ! मी का कल्पलतेखालीं उभी आहें, किंवा हा कुमार चिंतामणी आहे, कोण जाणे ! मग आतां आलिंगन द्यायला उशीर कां करावा ! पण नको. हा कोण, कुठला, हें कांहींच माहीत नसतां इतकी घाई करणं बरं नव्हे.

**पुंडरीक**--शुभ्र मुक्ताफळाच्या कांतीला दिपविणारी ही कोण बरं सुंदरी ! आणि एकाएकीं या लतेआडून कशी उत्पन्न झाली ! कदाचित् माझ्या स्पर्शानं शापमुक्त होऊन लतेची तर स्त्री झाली नसेल ! पण इतका कुठला माझा पुण्यप्रभाव ! तसं असतं तर ही लतिका अदृश्य झाली असती. तर मग ही कोण असावी ?

**पद्य. चाल**---अरसिक किति हा शेला-दीपचंदी.

ही का देवी वनिंची ॥ कीं लक्ष्मी विचरे मधुमासाची ॥ १ ॥ शोभा कुंद फुलांची ॥ कीं मूर्ति असे ही शशिकिरणांची ॥ २ ॥ सीमा लावण्याची ॥ मज हीच दिसे विधिकौशल्याची ॥ ३ ॥ माया कीं मदनाची ॥ जी मोहुनि टाकी मति तरुणांची ॥ ४ ॥

असो; हिलाच विचारावं ह्मणजे समजेल. अथवा कशाला विचारा ! कोणीका असेना विचारी ! विषयासक्त जनांप्रमाणं स्त्रीविषयक गोष्टींचा इतका विचार करून माझ्यासारख्या विरक्ताला कोणता लाभ होणार ! तर आतां माझा मित्र येईपर्यंत आपण अशा रम्यस्थानीं या वृक्षाखालीं बसून परमात्म्याचं ध्यान करावं म्हणजे इतका वेळ तरी सार्थकीं लागला. ' सच्चिदानंद ' ह्मणून नेत्र मिटून बसून ध्यान करूं लागतो. )

**महाश्वेता**·--( सुस्कारा सोडून ) मला पाहतां पाहतां एकाएकीं ह्म नेत्र मिटून ध्यान करीत बसला ! हे कपट्या मदना !

**पद्य. चाल**---वैशाखमासिं वासंतिक-दादरा.

बहु शांत दांत विषयविरत तापसी महा ॥
यावरि मन योजिसि हें न्याय काय हा ॥ ध्रु० ॥
जरि यासि कळे विव्हल मी कामसायकीं ॥
उपहास करुनि मानिल ही मूढ पोर कीं ॥
अथवा मज भस्म करिल शापपावकीं ॥
जावें हें उचित दिसें येथुनी गृहा ॥ १ ॥

पण हे मुनी म्हणजे सर्वांना पूज्य; तेव्हां यांची समाधि सरल्यावर यांना नमस्कार करून मग जावं. नाहीं तर हिनं मला नमस्कार कसा केला नाहीं म्हणूनच रागवायचे.

**पुंडरीक**—सच्चिदानंदस्वरूपाचं ध्यान करण्याकरितां नेत्र मिटून बसलों; परंतु या कुमारीचीच नखशिखांत मनोहर मूर्ति दृष्टिसन्मुख उभी राहते, हें काय! कदाचित् हिचं अद्वितीय लावण्य पाहून या नेत्रांची तृप्ति झाली नसेल, म्हणून असा प्रकार होत असावा. तर यांची एकदां तृप्ति करून सोडतों. हो. आम्हां जितेंद्रियांना काय! प्रत्यक्ष रति जरी अंकावर येऊन बसली, तरी व्रतभंगाची भीति नाहीं; मग या सुंदरीकडे नुसतं अवलोकन केल्यानं काय होणार? (तिच्याकडे पाहून) अरे हा काय चमत्कार! ही मघापेक्षां आतां अधिकच सुंदर दिसूं लागली!

### साकी.

एक कलेनें प्रतिदिनिं वाढे चंद्र शुक्लपक्षींचा ॥
क्षणोक्षणीं परि वाढत आहे हीच्या सौंदर्याचा ॥
अद्भुत हें मोठें ॥ पूर्वीं पाहिलें न कोठें ॥ १ ॥

अहाहा! अशी स्त्री दृष्टिसन्मुख असतां ज्यांचा मनोनिग्रह ढळत नाहीं, तेच खरे निग्रही. किती शुभ्र कांति! काय सौंदर्य! काय तारुण्याचं तेज! हे भूलोका धन्य आहेस तूं! (आनंदानें तिच्याकडे पहात डोलूं लागतो.)

**महाश्वेता**—नमस्कार करून जावं म्हटलं; पण यांचं हें डुलणं पाहून पुनः रहावंसं वाटतं.

**पुंडरीक**—(एकदम) शिव शिव! शांतं पापं! शांतं पापं! मी काय करतों हें! कुणीकडे चाललों? वास्तविक म्हणजे—

### दिंडी.

ग्राम्यविषयीं मग्न जे नर तयांचें ॥ स्त्रीस बघतां मन लुब्ध व्हावयाचें ॥ परी असतां तापसी ब्रह्मचारी ॥ मूढ झालों मी कैंवि या विचारीं ॥ १ ॥

हे उच्छृंखळ मना ! परत मागें, तुझा हा मार्ग नव्हे. ( नेत्र मिटून ' शिवोहं, शिवोहं, शिवः केवलोहं ' असा त्रिवार जप करून ) असो. मन तर आवरून घेतलंच. पण नेत्रांप्रमाणं कर्णांची जर एकवार तृप्ति होईल, तर पुनः या सुंदरीचं स्मरण सुद्धां केलं नसतं; पण भाषणप्रसंग घडल्याशिवाय हा योग कसा जुळून यावा; पण ती कल्पनाच नको. कारण--

पद्य. चाल—नाहीं कोणीही हुंगलें–दपिचंदी.

पाहिलें मी नुसतें इजला ॥ होता मोह मनावरि पडला ॥
आतां भाषण करिन जरी मी ॥ वाटे लीनचि होइन
कामीं ॥ १ ॥

**महाश्वेता**—( स्वगत ) एकदां आनंदाचं डुलणं आणि एकदां कोपाची मुद्रा, हें काय बाई ! तें कांहीं नव्हे; जावंच आतां. ( जवळ जाऊन ) भगवन्, मी नमस्कार करतें.

**पुंडरीक**—( आनंदानें ) अभीष्टमस्तु ! अभीष्टमस्तु ! ( स्वगत ) नमस्कार करतांना हिनं आपला पदर सरसावला, त्याचा वारा अंगाला लागून जर मला इतका आनंद होतो, तर प्रत्यक्ष हिच्या अंगस्पर्शानं किती होईल ! भाषण तरी किती मंजूळ ! ' मी नमस्कार करतें ! ' किती मधुर ! ( प्रकाश ) सुंदरी, इतकी दूर कां ? जवळ येऊन पुनः कांहीं तरी बोल. ( स्वगत ) हे कुसुमायुधा, तुझी शक्ति अतर्क्य आहे. मी सर्वस्वी तुझा किंकर झालों. आतां माझ्यानं धीर धरवत नाहीं. ( उठून प्रकाश ) हे शुभांगि !

पद्य. चाल—हे मना सोड कल्पना–धुमाळी.

ये अशी ॥ बैस मजसरासि ॥ उगिच कां भीसि ॥ नाहिं
कुणिं दुसरें ॥ दे सोडुनि अवघी शंका बिंबाधरे ॥ १ ॥

( तिला धरणार, इतक्यांत आंतून त्याचा मित्र **कपिंजल** ' मित्रा पुंडरीका ' ह्मणून हाक मारतो. ती ऐकतांच दचकून )

अरे अरे घात झाला! हा सर्व प्रकार माझ्या मित्रानं चोरून पाहिला वाटतं. आतां इथें राहून सोय नाहीं. या वृक्षाआड जाऊन लपावं. पुढें काय होईल तें होवो. सुंदरी, माझा–पण हा आलाच. (असें ह्मणून पळत जातो.)

**कपिंजल**—(बाहेर येऊन) मित्रा पुंडरीका! पुंडरीका! ओ देत नाहीं! कुठें गेला बरं? (**महाश्वेतेस**) हे कल्याणी, तूं एक तरुण, रूपवान्, कर्णावर पुष्पमंजरी ठेवलेला असा मुनिकुमार इथें पाहिलास का?

**महाश्वेता**--होय भगवन्. त्यांच्या पुण्यकारक दर्शनानं मी पवित्र झालें. नुकतेच ते या लतेआडून गेले. हा पहा त्यांचा कमंडलु इथेंच आहे.

**पुंडरीक**—(आडून) हरहर! सर्वस्वीं फसलों. गडबडींत तो माझा कमंडलु तिथेंच राहिला.

**महाश्वेता**--पण भगवन्, केवळ कौतुकानं मी आपल्याला कांहीं विचारतें, तेवढं सांगून माझ्यावर अनुग्रह करावा.

**कपिंजल**—(स्वगत) कमंडलु ठेवून गेला आहे, तेव्हां परत येईलच. (प्रकाश) बाई खुशाल विचार.

**महाश्वेता**—दुसरं कांहीं नाहीं. ज्यांचा आपण शोध करीत आहां ते कोण?

**कपिंजल**—ऐक; स्वर्गलोकीं वास करणारे, त्रिभुवनविख्यात, सकलवंद्य असे अतिरूपवान् श्वेतकेतु ह्मणून तपोनिधि मुनि आहेत. ते एके दिवशीं पूजेसाठीं कमलं आणण्याकरितां मंदाकिनी नदींत उतरले असतां, असा चमत्कार झाला कीं—

**पद्य. चाल**—मी कुमार तीहि कुमारी–धुमाळी.

पुंडरीककमलावरती कमलाश्री बसली होती ॥ पाहिउं तिनें त्या मुनिला, तद्रूपीं मोहित हो ती ॥ अवलोकन- मात्रें तीची संगेच्छा झाली पुरती ॥ चाल ॥ तिजपासुनि

सुत जो झाला ॥ मुनिहस्तिं तिनें तो दिधला ॥ स्वाश्रमींच वाढवि त्याला ॥ पुंडरीकनामें ख्याती ॥ चाल ॥ सहकला सकलही विद्या ॥ प्राप्त यास झाल्या असती ॥

तो हा माझा मित्र पुंडरीक आणि हा त्याचा वृत्तांत मीं तुला संक्षेपानं सांगितला.

**महाश्वेता**—या मुलीवर राग करणार नाहीं, तर त्यांच्या कर्णावर जी पुष्पमंजिरी आहे, ती कोणत्या वृक्षाची, एवढं विचारीन ह्मणतें. कारण तिचा सुवास अपूर्व असून फारच मधुर आहे.

**पुंडरीक**—( स्वगत ) माझ्या मित्राला माझ्याविषयीं कांहीं शंका आली नाहींशी दिसते. नाहीं तर तो तिच्याशीं इतक्या शांतपणानं कुठला बोलायला ! मग जावं तर आतां पुढें. पण—

**कपिंजल**—तुझी अतिशय उत्कंठा दिसते, ह्मणून सांगतों.

### साकी.

सुरतरुची ती कुसुममंजिरी नंदनवनदेवीनें ॥
पुंडरिकातें स्वीकारावी ह्मणुनि दिली प्रेमानें ॥
श्रवणीं ठेवाया ॥ रूपा भूषण साजाया ॥ १ ॥

**महाश्वेता**—ह्मणूनच इतका अलौकिक सुवास बरं !

**पुंडरीक**—( स्वगत ) ही संधी बरी आहे. ( पुढें येऊन ) हे कुमारिके, तुला या मंजिरीचा सुवास फार आवडलासा दिसतो. तेव्हां हा तिचा भाग्योदयच समजायचा. ही घे. तुझ्या कर्णावर ठेवतों. ( कानावर ठेवीत असतां कामातुर होतो. त्याच्या डाव्या हातांतून स्फटिकमाळ गळून पडते, ती **महाश्वेता** त्याला नकळत घेते.)

**कपिंजल**—( साश्चर्य स्वगत ) अरे, हा तर कामातुराप्रमाणं चंचल झाला. ती पहा हातांतली स्फटिकामाळसुद्धां गळून पडली आणि ती तिनं उचलून घेतली. हीं दोघंही परस्परांवर अनुरक्त झालीं यांत संशय नाहीं. ( आंतून ‘ ताईसाहेब ’ असा शब्द येतो. )

**महाश्वेता**—( दचकून ) अगबाई, तरलिका आली वाटतं.

**तरलिका**—( बाहेर येऊन ) ताईसाहेब ! हें का रुसणं कीं फुगणं ? ह्मणावं तरी काय चाला ? मी शोधून शोधून दमलें. शेवटीं सरोवरावर गेलें, तिथेंही तुह्मी नाहींत. ' तिला एकटीला कशी सोडून आलीस ' म्हणून आईसाहेब किती रागं भरल्या ! आतां तरी चला लवकर. त्या काळजी करीत बसल्या आहेत.

**महाश्वेता**—खरंच का ? चल तर. ( स्वगत ) प्रेमाची खूण म्हणून त्यानं ही स्फटिकमाळ मित्राला नकळत हळूच माझ्या हातांत टाकली. ती आधीं कंठांत घालावी. (तसें करून ) चल तरलिके.

**कपिंजल**—( स्वगत ) बरं झालं; अनायासं पीडा टळली.

**पुंडरीक**—पण हे शुभांगि–(ती जाते. तिच्यामागून जाऊं लागतो.)

**कपिंजल**—हां ! ( त्यास आडवून रागानें ) पुंडरीका ! तूं मोठा वैराग्यशील, विषयद्वेष्टा, मनोनिग्रही असा असून काय निंद्य प्रकार आरंभला आहेस हा ! वाः !

**पद. चाल**—वाहवा थोर तुं भूपाला–धुमाळी.

धैर्य कुठें तव, इंद्रियनिग्रह, ब्रह्मचर्य तें कोठें ॥ उपदेशहि ते गुरुचे विसरसि, नवल वाटतें मोठें ॥ छे हा मार्ग नव्हे बरवा ॥ करिसि न धर्माची परवा ॥ १ ॥ निष्फल झाली कां ती प्रज्ञा, ज्ञानहि फुकटचि गेलें ॥ अर्थ कोणता शास्त्राभ्यासीं, काय तपानें केलें ॥ ज्ञाते तुज-सम जरि फसती ॥ जाणुनि विषयपंकिं पडती ॥ २ ॥

**पुंडरीक**—( स्वगत ) यानं खरा प्रकार जाणला नाहीं असं मीं म्हटलं, पण माझा तर्क चुकला. आतां याला काय सांगावं ? ( प्रकाश ) मित्रा कपिंजला, तूं भलभलत्या शंका घेऊन मला व्यर्थ दूषण देतोस; पण माझ्या हातून असं झालं काय तें तरी सांग.

**कपिंजल**—( रागानें ) झालं काय ? अरे कामांधा ! त्या पोर-टीनं तुझी स्फटिकमाळ नेली ती तुला दिसली नाहींच. आतां हृदय घेऊन चालली आहे तें तरी आवरून धर.

**पुंडरीक**—माझी स्फटिकमाळ तिनं घेतली ! (नाहींशी पाहून लटका आवेश आणून) मला नकळत तिनं माझी माळ नेली का ? पहातों कशी घेऊन जाते ती. (ती गेली त्या दिशेकडे वळून स्वगत) सुंदरी, इतका वेळ तुझ्या मुखचुंबनाकरितां माझ्या अधरांचं स्फुरण होत होतं, तेंच आतां कोपाचं असं दाखवितों; पण चतुर असलीस तर खरं मर्म ओळखशील. (प्रकाश) कायग ए उन्मत्ते, माझी स्फटिकमाळ चोरून घेऊन चालली आहेस, पण संभाळ, ती आणून दिल्यावांचून एक पाऊल पुढें टाकशील तर शापून दग्ध करीन. आण, आण कुठें आहे ती.

**तरलिका**—(घाबरून) ताईसाहेब हे आपल्यालाच उद्देशून बोलतात का ? कुठें आहे ती माळ ? अपराध झाला, क्षमा करा, ह्मणून ती अगोदरच नेऊन द्या कशी.

**महाश्वेता**—(स्वगत) पूर्वीच्या कृतीवरून हा काप कांहीं खरा दिसत नाहीं; मित्राची समजूत करण्यापुरताच दिसतो. पण मागितली त्या अर्थी दिलीच पाहिजे. (स्फटिकमाळ ह्मणून गळ्यांतील मोत्यांचा हार काढून त्याच्यापाशीं परत येऊन) ही घ्यावी भगवन् आपली स्फटिकमाळ (त्याच्या हातांत टाकते.) आणि माझ्या अपराधाची मला क्षमा करावी. (असें म्हणून जाते.)

**पुंडरीक**—(स्वगत) प्रिये, मींच तुझी क्षमा मागावी; पण काय करूं ? (मित्राकडे वळून प्रकाश) काय मायावी पहा. माझ्या हातांतली माळ चोरून घेतलीन् आणि म्हणते अपराधाची क्षमा करा ! मित्रा कपिंजला, आतां तर झालं. ही आणली पहा स्फटिकमाळ.

**कपिंजल**—(पाहून संतापानें) काय ! ही स्फटिकमाळ !

### दिंडी.

अंध झालों वाटतें का तुला मी ॥ काय मानिसि तूं जसा मीहि कामी ॥ अरे मूढा हा हार, माळ नोहे ॥ दृष्टि उघडुनि करिं काय नीट पाहे ॥ १ ॥

पुंडरीक--( पाहून लज्जेनें मान खालीं घालून स्वगत ) अरे अरे! खराच हार हा! हं कसं झालं? माझं हृदय चोरायचं तें चोरून, तिनं मला असं फसवायचं तरी नव्हतं. ( प्रकाश ) मित्रा, तुला खरंच सांगतों-हें पहा-तसं नव्हे-ती मी--

कपिंजल—चल, बोलूं नकोस.

अनुष्टुप्.

विचारशून्या कामांधा ॥ धर्ममार्गपराङ्मुखा ॥
दुराचारा भ्रष्टचित्ता ॥ नको संबंध यापुढें ॥ १ ॥

( रागानें निघून जातो. )

पुंडरीक—( कांहीं वेळानें वर पाहून ) मला वाटलं हा जायचा नाहीं, पण खराच गेला. त्याला आडवावं असं एकदां मनांत आलं; परंतु भीतीमुळं धैर्यच होईना. त्यानं कोप करावा अशी माझ्या हातून कृति झाली खरी, पण मी तरी काय करूं? माझं मन काममोहित झालेलं, आणि हे माझे आशाळभूत नेत्र लावण्यरसाचं प्राशन करण्यांत गुंतलेले; अशा प्रसंगीं तिनं माझ्या हातांत काय टाकलं हें मलासुद्धां समजलं नाहीं, यांत माझा दोष कीं तिच्या लावण्याचा दोष बरं? तिनं तरी माझी भिकार स्फटिकाची माळ घेऊन हा बहुमोलाचा मुक्ताहार मला कां दिला असता? मी तिच्या रूपावर मोहित झालों, तशी ती माझ्यावर मोहित झाली ह्मणावं तर--

साकी.

आश्रमवासी कंदफलाशन अरसिक मुनि मी कोठें ॥
सुखलालित बहु रसिक चतुर ती मदनमंजिरी कोठें ॥
कैसी मजवरती ॥ मोहित व्हावी रमणी ती ॥ १ ॥

( विचार करून ) बरं तसं न ह्मणावं तर-

पद्य. चाल--काय मला भूल पडलि-दादरा.

मित्रा मम जन्मकथा पुशिलि कां तिनें ॥
श्रवण करी सर्व कशी तृषितशा मनें ॥ ध्रु० ॥

एकलि मजजवळि उभी केंवि राहिली ॥
कर गाला लागतांचि मधुर हासली ॥
नियतां मजवरुनि बळें दृष्टि काढिली ॥
प्रकट करी आत्मभाव अन्य रीतिनें ॥ १ ॥

यावरून तिचं मन माझ्यावर जडलं यांत संशय नाहीं. पण जडून उपयोग काय ? ती कोण, कुणाची, कुठें रहाते व तिचं नांव काय ? यांतील मला एकही माहीत नाहीं ( विचार करून ) तेव्हां अशा स्थितींत तिचा शोध लागावा कसा ? तिच्या सखीच्या बोलण्यावरून ती सुंदरी आपल्या आईबरोबर या अच्छोदसरोवरावर स्नानार्थ आलेली असावी असं दिसतं. तर या पुष्परेणूंवर तिच्या पदकमलांच्या मुद्रा उमटल्या आहेत, यांच्या अनुरोधानं जावं; ह्मणजे कदाचित् तिचा कांहीं शोध लागेल. ( जातां जातां ) एवढ्याशा अल्पकाळांत माझ्या मनोवृत्तींत किती अंतर पडलं पहा. —

साकी.

निराकार त्या निर्गुण रूपा बहु दिन धुंडित होतों ॥
सगुण अशी साकार सुंदरी दिसतां छंद सुटे तो ॥
लाभे जरि मजला ॥ मानिन मुक्तिलाभ घडला ॥ १ ॥

( जातो. )



# अंक २ रा.

---

## प्रवेश १ ला.

**स्थळ**– अच्छोदसरोवराजवळील वनप्रदेश.

**कपिंजल**—( सचिंत प्रवेश करून ) माझ्यासारख्या उदासीनालासुद्धां हा मित्रविरह इतकी पीडा देतो, मग प्रापंचिकांची काय दशा होत असेल ! एकूण प्रियवस्तूची वास्तविक योग्यता तिचा विरह झाल्यावांचून कळत नाहीं हेंच खरं. बालपणापासून पुंडरीकाचा आणि माझा एक क्षणभरही विरह झाला नसल्यामुळं मला आज अगदीं चैन पडत नाहीं. माझा प्राण बाहेर गेला आणि हें शरीर त्याला शोधीत वनांत चोहोंकडे भ्रमण करीत आहे, असं वाटतं. कुठें गेला असावा बरं !

**पद्य. चाल**– साध्य नसे मुनिकन्या.–दीपचंदी.

कामें मोहित केला ॥ नकळे का त्या कन्येमागुनि गेला ॥ ध्रु० ॥ कीं भेटेना मजलागोनी ॥ शोधितसे कीं मजला विपिनीं ॥ किंवा कोपें मज सोडोनी ॥ जाय कुठें, का रुसला ॥ कवण्या स्थळिं मीं पाहुं तयाला ॥ १ ॥

पुंडरीका ! पुंडरीका ! मीं तुजवर कोप केला, त्याची मला क्षमा कर, आणि त्वरित येऊन मला आलिंगन दे. पण तो आहे कुठें ? ( पुढें जातो. ) जसजशी माझ्या मनाची निराशा होते, तसतशा मित्राविषयीं भलभलत्या कल्पना मनांत येतात. लज्जेमुळं तो प्राणत्याग करायला सुद्धां चुकायचा नाहीं. ( पाहून ) हा मी अगदीं सरोवराच्या कांठीं आलों. कदाचित् त्या कन्येमागून येथपर्यंत आला असेल, आणि ती सखीबरोबर घरीं गेली असं पाहून इथेंच कुठें निराश होऊन बसला असेल. ही पुढें एक लतेची निबिड जाळी दिसते तींत पाहूं बरं. ( जवळ जाऊन पाहून आनंदानें ) तो पहा मा-

ह्या मित्र ! छे पण नव्हे. हा कुणी निस्तेज तापसी असावा. ( न्याह्याळून ) माझ्या दृष्टीला भुरळ तर पडली नाहीं ! माझा मित्रच हा ! शिव शिव ! काय दशा झाली याची ! हा सर्व त्या दुष्ट मदनाचा खेळ दिसतो. हा अधमा मन्मथा, शंकरांनीं तुझा देह दग्ध केला, त्याबरोबर तुझी निर्दयता कशी दग्ध झाली नाहीं, याचं मला आश्चर्य वाटतं. अरे, हरिणाप्रमाणं या सरळ स्वभावाच्या मुनिकुमारानं तुझा असा काय अपराध केला होता बरं ! समजलों. तुझा शत्रु जो कैलासनाथ, त्याच्या पूजनाकरितां हा जात होता, हें तुला सहन न होऊन तूं याच्यावर असा अकस्मात् घाला घातलास; पण तुझ्याकडे तरी काय दोष ! तुझं कर्म तूं केलंस. मला हेंच नवल वाटतं, कीं—

दिंडी.

धैर्यनिधि जो तापसी ज्ञानराशी ॥
दास केलें मन्मथें केंवि त्यासी ॥

अथवा नवल कसलं ?

थोर ह्मणती अनुभवें तेंचि साचें॥
कठिण तरुणाचें शील टिकायाचें ॥ १ ॥

बरं, महाश्वेते, स्त्रिया ह्मणजे स्वभावसिद्ध कोमल मनाच्या असतात; ह्मणून तुला तरी कांहीं दया यायची होती ! माझ्या भोळसर मित्रावर तूं आपल्या तीव्र नेत्रकटाक्षांचा वर्षाव कसा केलास ? हर हर ! मित्रा पुंडरीका ! काय ही तुझी स्थिति झाली ! ( जवळ जाऊन वेलीच्या पानानें त्याला वारा घालूं लागतो. )

**पुंडरीक**—छे, छे ! प्रिये महाश्वेते, तुला इतके श्रम—(**कपिंजल** आहे असें पाहून ) हाय हाय ! मदना, कायरे हा माझा उपहास चालविला आहेस ?

**कपिंजल**—(त्याच्या जवळ बसून खांद्यावर हात ठेवून) मित्रा पुंडरीका ? महाश्वेता कोण ? आणि हें काय आरंभलं आहेस तूं ?

**पुंडरीक**--दैव माझं ! कपिंजला, तुला सर्व वृत्तांत कळला असून, केवळ मला लाजविण्याकरितां 'हें काय' ह्मणून काय विचारतोस ?

**कपिंजल**-- सर्व वृत्तांत मीं अंतर्ज्ञानानं जाणला आहे; पण तुला इतकं विचारतों कीं--

**पद्य. चाल**- गंगानदि ती सागर सोडुनी-धुमाळी.

**सांग गुरूनीं हेंच तुला का धर्मशास्त्र पढविलें ॥**
**तपःसिद्धिचें साधन खासें हेंचि तुला का दिसलें ॥ १ ॥**
**याच युक्तिनें मोक्षलाभ हें रहस्य कोणीं कथिलें ॥**
**यमनियमाचें तंत्र एक हें, काय तुझ्या मनिं भरलें ॥ २ ॥**
**साधु निंदिती ज्या कृत्याला तेंचि कसें तुज रुचलें ॥**
**जागृतपणिं तव विवेकधन तें सांग कुणींरे लुटिलें ॥ ३ ॥**

सांग, बोलत कां नाहींस? दुसरं असं विचारतों, कीं केवळ प्राकृत लोक, अज्ञानामुळं ज्या मार्गाचा अवलंब करितात, त्याचं चिंतन करणं सुद्धां तुझ्यासारख्या सच्छील ज्ञानसंपन्नाला महापाप होय; असं असतां तोच मार्ग तूं आक्रमूं लागलास, तेव्हां तुला काय ह्मणावं ? यापासून कांहीं सुखाचा लाभ होईल असं वाटत असेल, तर तशी कल्पनासुद्धां मनांत आणूं नकोस.

**पुंडरीक**-- ( गळ्यास मिठी मारून ) मित्रा,

**पद्य. चाल**-' शैवालें युक्त जैसें '- त्रिताल.

**जें जें तूं बोलसी तें मजला का श्रुत नसे ॥**
**परि त्याचें काय आतां, मज भरलें स्मरपिसें ॥**
**जाणसि तूं इंद्रियांचें चालक हें मन असे ॥**
**स्वाधिन तें पूर्ण झालें मदनाच्या, करुं कसें ॥ १ ॥**

**कपिंजल**-- पुंडरीका, तुझ्यासारख्याचं मन त्या मदनाच्या स्वाधीन ! हे शब्द तरी कसे उच्चारतोस ?

पद्य. चाल–' निग्रहानुग्रहिं दक्ष. '–झंपा.

असा कोणरे मदन तो, वारि त्यातें ॥ काय भीसी तया पामरातें ॥ ध्रु० ॥ स्वैरगति धांवतीं इंद्रियें हीं तुझीं । जेंवि वर्षानदी पाट फुटतां ॥ संयमें वश करीं त्यांसि, विद्याबळें । शांतवी क्षोभल्या मानसातें ॥ ठाउका तुज असे विषयपरिणाम तो । वांछिसी काय मग सेवुनी त्या ॥ जाय दीपावरी अग्निकीटक जसा ॥ तेंवि ही कृति दिसे स्पष्ट मातें ॥

**पुंडरीक**— मित्रा कपिंजला, तूं ह्मणतोस हें योग्यच आहे, कारण--

पद्य. चाल–' अष्टमूर्ति परमेश. '–धुमाळी.

त्या मदनानें नाहिं वेधिलें तीव्र शरीं तुजसी ॥
ह्मणुनि कथिसि या उपदेशाच्या लांब कथा मजसी ॥
जो नर पाहे, ऐके, जाणे, सदसद्भेदातें ॥
तोचि एकला पात्र असे उपदेश घ्यावयातें ॥
परंतु झालों अंध बधिर मी, ज्ञानहि गेलें तें ॥
हितबोधाचा काळ लोटला कांरे मग शिणसी ॥ १ ॥

**कपिंजल**—शेवटीं तुझ्या मतानें मीच महामूर्ख ठरलों तर ! अस्तु. हा चाललों मी. तुझा मार्ग तुला सुखप्रद होवो. [ जाऊं लागतो. ]

**पुंडरीक**—छे, छे ! मित्रा, माझ्यावर असा कोप करूं नकोस.

पद्य. चाल–' कांते फार तुला मजसाठीं '— दीपचंदी.

कोण जगीं या तुजविण दुसरा मज विश्वासाचा ॥ मित्र जिवाचा कोण दुजारे आश्रय शोधूं अन्य कुणाचा ॥ ध्रु०॥ दुःख निवेदूं कोणापाशीं ॥ कोण संकटीं स्नेही मजसी ॥ घालुनि पोटीं अपराधातें, कोण करिलरे बोध हिताचा॥१॥

(एकाएकीं विव्हळ होऊन पडतो.)

**कपिंजल**—( त्याला सांवरून ) अरे अरे प्रबल संतापानं याला मूर्च्छा आली. ( कदलीदलानें वारा घालतो. ) ही स्थिति फार विकोपाला पोहोंचली. व्यर्थ मी उपदेश करण्याच्या नादीं लागलों. आतां याचा हा मदनज्वर कसा कमी होणार ? याला खरी गुणकारी औषधी एक ह्मणजे गंधर्वकन्या महाश्वेता; पण ती कशी प्राप्त व्हावी ! असो; या कामीं कालक्षेप करून कांहीं उपयोग नाहीं. प्रसंगीं कशाही उपायांची योजना करून मित्राचे प्राण राखावे असं शास्त्र आहे. हा कदाचित् जाऊं द्यायचा नाहीं, ह्मणून याला कांहीं तरी कारण सांगून आपण आतां महाश्वेतेकडे जावं आणि तिची प्रार्थना करून पहावी, दुसरा मार्ग नाहीं. मित्रा, सावध हो.

**पुंडरीक**— ( कांहीं वेळानें ) मित्रा, माझे प्राण व्याकुळ झालेरे. मला वांचीव आतां.

**कपिंजल**—भिऊं नकोस. ( स्वगत ) अहा ! ही युक्ति बरी सुचली. ( प्रकाश ) मित्रा, मीं पुष्पं वेंचीत असतां इथें जवळच एक दिव्य औषधी पाहिली; तिचा रस अंगाला लावला ह्मणजे कामसंताप कितीही वाढला असला तरी तो अगदीं नाहींसा होतो, असं मीं ऐकलं आहे. तर कांहीं वेळ तूं असाच धीर धरून रहा, मी आतां जाऊन ती घेऊन येतों.

**पुंडरीक**—मित्रा, कामसंताप औषधीनं बरा होतो ? बरं जा. ती तरी लौकर घेऊन ये.

**कपिंजल**—आत्तां आणतों; तोंपर्यंत तूं या कमलशय्येवर निजून रहा. हां—असा. ( उठून ) हे अनंगा, कुसुमायुधा ! आतां एवढी तरी माझी विनंति ऐक.

### साकी.

श्वासमात्रजीवित हा माझा दीन मित्र बघ निजला ॥<br>
नको छळूं त्या, भेटुनि येतों अल्पचि काळें तिजला ॥<br>
तोंवरि सांभाळी ॥ त्राता अन्य न या काळीं ॥ १ ॥

( तो जातांच पडदा पडतो. )

---

## प्रवेश २ रा.

### स्थळ—महाश्वेतेचें मंदिर.

( सचिंत अशी **महाश्वेतेची** दासी **मधुकरिका** प्रवेश करते. )

**मधुकरिका**— इतके दिवस मी ताईसाहेबांच्या सेवेंत आहें; पण त्यांचं ह्मणजे सदा हसतमुख असायचं. मग आजच असं कोमेजून कां गेलं कोण जाणे. बरं, तरलिका रात्रंदिवस सावली-सारखी त्यांच्याजवळ असायची, तीही अजून आली नाहीं. ( दाराकडे पाहून ) ही कोण ? मंजरी वाटतं ? ताईसाहेबांनीं स्वतः केलेला पंचरंगी रेशमाचा मोर कादंबरीला दाखवायला ह्मणून काल गेली होती, ती परत आली. मंजरी ये, देवी कादंबरीला आवडला का तो मोर ?

**मंजरी**—( येऊन उत्कंठेनें ) तुझ्याशीं बोलायला मला वेळ नाहीं. अगोदर ताईसाहेब आंत आहेत का सांग.

**मधु०**—आहेत; पण ( मंजरी घाईनें आंत जाऊं लागते—तीस अडवून ) छे, छे ! आंत जायचं नाहींहो.

**मंजरी**—( थांबून ) तें कां ?

**मधु०**—अग हें बघ, 'तरलिकेशिवाय कुणाला आंत सोडूं नकोस' असं सांगून ताईसाहेबांनीं मला इथें उभी केली आहे.

**मंजरी**—म्हणजे, हें आज नवीनच दिसतं ! रागावल्या आहेत कीं काय कुणावर ?

**मधु०**—तें काय सागूं बाई मी. आज पर्वकाळ, ह्मणून आईसाहेबांबरोबर त्या सरोवरावर अंग धुवावला गेल्या होत्या. तिथून उशीरानं परत आल्या, त्या कुणाशीं भाषण नाहीं, कांहीं नाहीं, मुकाट्यानं आंत गेल्या. मीं मनांत ह्मटलं, उन्हांत जायची कधीं संवय नाहीं, त्यानं श्रम झाले असतील; म्हणून वाळ्याचा पंखा घेऊन हळूच आंत गेलें, आणि पहातें तों सुस्कारे सोडीत, हातावर तें

सुकलेलं मुखकमल ठेवून विचार करीत, आपल्या पलंगावर बसलेल्या! मीं जवळ जाऊन ' ताईसाहेब काय होतं ' ह्मणून हळूच विचारलं. तेव्हां ' कांहीं होत नाहीं. तूं बाहेर उभी रहा, आणि आतां तरलिका येईल तिच्याशिवाय कुणाला आंत सोडूं नकोस ' असं म्हणाल्या.

**मंजरी**—( विचार करीत स्वगत ) सरोवरावर अंग धुवायला गेल्या होत्या आणि तरलिका मागून येणार—( प्रकाश ) काय असेल तें असो; पण तुला सांगतें कांहीं तरी——

**मधु०**——( तिचा हात दाबून ) अग, गप्प गप्प. ती पहा तरलिका आली. ( **तरलिका** येते ) आलीस बाई ? बरं झालं. ताईसाहेब तुझी अगदीं वाट पहाताहेत. त्या पहा वरचेवर खिडकीशीं येतात, पुनः जातात. अंग धुवून आल्यापासून असं चाललं आहे सारखं. तुला ठाऊक असेल याचं कारण !

**तरलिका**——कारण कसलं ? या वयांत असंच व्हायचं.

**मंजरी**-–( **मधुकरिकेस** ) हेंच ह्मणणार होतें मी. या हंसीला त्या सरोवरावर एखादा सुंदर हंस दिसला असेल झालं. दुसरं काय ?

**तरलिका** –बरं, तुह्मी दोघीही चला आतां, मी आहें इथें. ताईसाहेबांचं जेवणखाण झाल्यावर मग या. ( त्या दोघी तिच्या कानाशीं कांहीं कुजबुजून गेल्यावर ) आतां ही त्या मुनिकुमारानं दिलेली पत्रिका ताईसाहेबांना नेऊन द्यावी. ( वर पाहून ) मधुकरिकेनं ह्मटलं तें खरंच. त्या पहा ताईसाहेब पुनः खिडकीशीं आल्या. नुसत्या त्या मुनिकुमाराच्या दर्शनानं यांची काय दशा झाली बाई ही ! ओंठावरची लाली कमी पडली, दृष्टि मंद दिसायला लागली, पाऊल जड झालं, आनंदवृत्ति मावळली; एक का दोन. बरं, या करतात तरी काय तें पहावें अगोदर. ( आड उभी राहते. )

**महाश्वेता** –

**पद्य. चाल.**– नृपममता रामावरतीं.–धुमाळी.

**तेथेंच उभी कीं आलें ॥ जागी कीं शयनीं निजलें ॥**
**नाकळे ॥ हें दुःख सौख्य कीं झालें ॥ उत्सवें कीं व्यसनीं**

पडलें ॥ नाकळे ॥ मी स्तब्धचि अथवा बोलें ॥ हंसलें कीं रोदन केलें ॥ नाकळे ॥ चाल ॥ करुं काय ॥ लागली हाय ॥ यास सदुपाय ॥ कोणते कथिले ॥ पुसुं कुणा कोण त्या बोले ॥ नाकळे ॥ १ ॥

माझी अशी अवस्था करून सोडणारा तो मदनसुंदर मुनिकुमार या दक्षिण दिशेकडे असल्यानं त्रिभुवनांतील सर्व गुणांचं, रूपाचं, यौवनाचं भांडारच इकडे आहे असं वाटतं. मीं पुष्कळदां याच गवाक्षांतून या दिशेकडे पाहिलं असेल, परंतु आजच्यासारखी रमणीय ही मला पूर्वी कधींच दिसली नव्हती. हा इकडून येणारा वारासुद्धां त्रासदायक असून मला किती प्रिय वाटतो ह्मणून सांगूं ! हे दक्षिणानिला, तूं त्या मुनिकुमाराच्या अंगाला स्पर्श करून आलास ह्मणून विचारतें–( डाव्या कानाला हात लावून एकदम चपापून मोट्यानें ) अगबाई ! त्या मेल्या वाऱ्यानं माझ्या कानावरची पुष्पमंजिरी नेली वाटतं.

**तरलिका**--( पुढें सरून ) ताईसाहेब, उजव्या कानावर ठेवून डाव्या कानावर पाहिली तर कशी सांपडेल ?

**महाश्वेता**-- ( आंहेशी पाहून ) आज बाई मला असा संशय पडल्यासारखा झाला आहे, पण तूं इतका वेळ होतीस कुठें ?

**तरलिका**--आपण आईसाहेबांबरोबर अंग धुवून पुढें आलांत, आणि मी कांहीं कमळाचे कळे घेऊन मागून येत होतें, इतक्यांत ज्या मुनिकुमारानं आपल्या कानावर ही मंजिरी ठेविली तो वृक्षांच्या गर्दीतून चटकन् माझ्यापुढें येऊन उभा राहिला.

**महाश्वेता**-- ज्यानं माझ्यापाशीं आपली माळ मागितली तो ?

**तरलिका**-- ( हंसत ) होय. ज्याच्या हातांत आपण माळे ह्मणून हार दिलात तो, तोच.

**महाश्वेता**-- तर मग--( बाहू पसरून ),

पद्य. चाल.-सुटला पितृदिशेचा वारा.- धुमाळी.

आधीं आलिंगन दे मजला ॥ धरुं दे कवळुनि हृदयीं

तुजला ॥ बहु पुण्य संग्रहीं तुझ्या ह्मणोनिच त्याला ॥
तूं पाहिलेंस पुनरपि, जन्म सफल तव झाला ॥ १ ॥

( बसून ) अगदीं माझ्या जवळ बैस; लाजूं नकोस. यावेळीं मी तुझी ताईसाहेब नव्हे. तूंच माझी ताईसाहेब; आणि मी विचारतें तें सांग.

तरलिका-- पण इथें उभी राहून सांगतें ताईसाहेब.

महाश्वेता-- नाहीं, माझ्याजवळच बसलं पाहिजे. अश्शी–हं, सांग आतां; तो तुझ्यापुढें येऊन उभा राहिला, तेव्हां रागानं अगदीं लाल झाला होता का ?

तरलिका— रागानं नाहीं, अनुरागानं लाल झाला होता.

महाश्वेता— नाहींग, मीं त्याची माळ चुकून आणली, ह्मणून तो संतापला होता का ?

तरलिका— छे, ताईसाहेब माळ आणली ह्मणून संतापला नव्हता. त्याचं मन चोरून आणलंत, ह्मणून संतापलेला दिसला.

महाश्वेता—बरं, माझा मोत्यांचा हार होता का त्याच्या हातांत ?

तरलिका— होता, पण मला पहातांच मी कदाचित् तो मागेन, म्हणून त्यानं आपल्या वल्कलांत उराशीं लपवून ठेविला.

महाश्वेता—(स्वगत) हीं सर्व चिन्हं बरीं दिसतात. (प्रकाश) पण काग, तो रागीट मुद्रेचा त्याचा मित्र जवळ नव्हता का ?

तरलिका— मला वाटतं, त्याला चुकवून हा सरोवरावर आला होता. कारण बोलतां बोलतां हळूच वळून मागं पहात असे.

महाश्वेता— बरं, तुला तो काय ह्मणाला तें सांग आतां.

तरलिका— मला त्यानं प्रथम मोठ्या आतुरपणानं "तुझ्या ताईसाहेब कोण ? कुणाच्या ? कुठें राहतात ?" असे एकामागून एक प्रश्न केले. मीं सर्व सांगितलं. मग पुनः चोहोंकडे पाहून मोठ्या आर्जवानं मला ह्मणाला कीं, "कृपा करून माझं एक काम करशील का ?"

**महाश्वेता**— मग ?

**तरलिका**— तेव्हां मीं हात जोडून म्हटलं " भगवन्! आपण सर्व जगाला पूज्य, तेव्हां मनांत कसलीही शंका न आणतां काय ती आज्ञा करून माझ्यावर अनुग्रह करावा. " मग त्यानं आपल्या वल्कलाची एक पट्टी फाडून, तिच्यावर तमालपत्रांच्या रसानं कांहीं लिहून ती मला दिली, आणि म्हणाला, कीं " तुझी ताईसाहेब एकटी पाहून तिच्याजवळ ही दे. " ( विड्याच्या डब्यांतून काढूं लागते. )

**महाश्वेता**—कुठें आहे ती ? दे. दे अगोदर पाहूं. ( तरलिका देते. ती घेऊन वाचते. )

**पद्य. चाल.-कां आड सवे तूं येसी.–धुमाळी.**

**हें काय वरें त्वां केलें ॥ ध्रु० ॥**
**मृणालसम मुक्तालतिकेतें ॥ दावुनि जैसें हंसवरातें ॥ तैसें मन्मानसजन्म्यातें ॥ बहु दूर विलोभुनि नेलं ॥ १ ॥**

गडे तरलिके, तूं मला हें अमृतच पाजिवलंस. तूं मला जीवदान दिलंस. आतां हे तुझे उपकार कसे फेडूंग ? ही पत्रिका दहादां वाचूं, शंभरदां वाचूं कीं हजारदां वाचूं असं झालं आहे मला.

( **महाश्वेता** मनन करीत आहे इतक्यांत एक कंचुकी येतो. )

**कंचुकी** - ताईसाहेब ! बाहेर एक मुनिकुमार उभा आहे. त्यानं आपलं—

**महाश्वेता**—( आनंदानें ) मुनिकुमार ! तरलिके, चल तर लवकर, त्याला सामोरे जाऊं चल, तोच तो

**कंचुकी**—त्यानं आपलं नांव कपिंजल असं सांगितलं. त्याच्या मनांतून आपल्याला भेटायचं आहेसं दिसतं. मग जशी आज्ञा.

**महाश्वेता**—( विरस होऊन ) सखे तरलिके, मुनिकुमार आला हें ऐकतांच जें सौख्याचं चित्र मनापुढें उभं राहिलं, तें त्याचं नांव कपिंजल हें ऐकतांच सारं दुःखाचं झालं. ( **कंचुकीस** ) बरं जा.

त्याला घेऊन ये. ( तो जातो. ) कायग सखे, तो कपिंजल कशाला आला असेल बरं ? त्या कुमाराचा शोध करायला तर आला नसेल ? किंवा माझ्याकडून सर्व काढून घेऊन ही गोष्ट आईला आणि बाबांना कळवावी असा तर त्याचा हेतु नसेलना ?

**तरलिका**—तो पहा आलाच ताईसाहेब. आपण म्हणतां त्यांतलं कांहीं नसावं. कारण त्याची मुद्रा कष्टी दिसते.

**महाश्वेता**—( तो आल्यावर प्रणाम करून त्यास आसन दाखवून ) भगवन्, या आसनावर बसावं. ( **कपिंजल** बसल्यावर तरलिकेकडे शंकित मुद्रेनें पाहूं लागतो. ) भगवन्, ही माझी सखी, अगदीं विश्वासांतली आहे. आपल्या मनांतन जें बोलायचं असेल तें खुशाल बोलावं.

**कपिंजल**—गंधर्वकन्ये, काय बोलूं ! लज्जेनं माझी वाणीच चालत नाहीं. कंदमुळं भक्षण करणारा मुनिकुमार कुणीकडे, आणि विषयवासनेनं कलुषित झालेला असा प्रपंच कुणाकडे; कशास कांहीं संबंध ! असो; भगवदिच्छा बलीयसी ! तुला सांगितल्यावांचून गत्यंतर नाहीं, म्हणून सांगतों. पुंडरीकाला सोडून मी रागानं निघून गेलों हें तुला विदित आहेच. कांहीं काळानं तो काय करतो म्हणून पहाण्याकरितां परत आलों, तों तिथें मित्र नाहीं, म्हणून त्या वनांत त्याचा शोध करूं लागलों. शोधतां शोधतां तो अच्छोदसरोवराच्या काठीं एका लतामंडपांत तुझा मुक्ताहार उराशीं धरून अश्रु गाळीत बसलेला दिसला. महाश्वेते, जो आज प्रातःकाळीं सूर्याप्रमाणं तेजःपुंज आणि ऐरावताप्रमाणं भव्य देहाचा दिसत होता, तोच माझा मित्र, आंत पेटलेल्या मदनज्वालांच्या योगानं अतिशय निस्तेज आणि कृश दिसूं लागला.—नंतर मीं प्रसंगानुरूप नानाप्रकारं त्याला बोध केला; परंतु त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं माझा उपदेश ऐकून, मला मिठी मारून अगदीं दीनवार्णानं म्हणाला, मित्रा,

**पद्य. चाल.**—पांडु नृपति जनक जया.–दादरा.

विव्हल मी कामशरीं ॥ त्याचा प्रतिकार करीं ॥ न घडे हें त्वरित तरी ॥ प्राण चालले ॥ १ ॥

त्याचे उद्गार कानीं पडतांच कांहीं मिषानं मी तुझी गांठ घेण्या-करितां इकडे आलों. आतां अशा स्थितींत त्याच्या प्रीतीला योग्य, आमच्या येण्याला शोभेल, आणि तुला स्वतःला रुचेल, असं करा-यला तूं समर्थ आहेस.

**महाश्वेता**—( स्वगत ) हें या मुनिकुमाराचं भाषण ऐकून मी सौख्यामृतसागरांत मग्न झालें कीं काय असं वाटतं. पण याला आतां काय सांगूं ? ( विचार करीत बसते. )

**कपिंजल**—( स्वगत ) ही विचारांत पडल्यासारखी दिसते. माझ्या भाषणाचा हिनं अनादरही केला नाहीं, किंवा तें ऐकून हिला कोपही आला नाहीं; तेव्हां माझ्या मित्राची हिला दया आलीसं दिसतं. मात्र स्पष्ट सांगायला ही लाजते, तर आतां आपण जावं. हिला तें स्थान माहीत आहेच. ( प्रकाश ) बरं महाश्वेते, हा पहा भगवान् सविता अस्तास चालला. माझा मित्र त्या लतामंडपांत एकटा आहे. ह्मणून मी निरोप घेतों आतां. पण—

साकी.

मम मित्रावरि करीं दया गे प्राणदान दे त्यासी ॥ अंज-
लि जोडुनि हीच दक्षिणा मागतसें तुजपाशीं ॥ याचक
तुष्ट करीं ॥ इच्छा कांहिं नसे दुसरी ॥ १ ॥

( महाश्वेता प्रणाम करते; तो निघून जातो. )

**महाश्वेता**--सखे, हा मेला दुष्ट मदन मला एकटीलाच त्रास देऊन राहिला नाहीं; त्या कुमाराची सुद्धां त्यानं काय अवस्था केली ती ऐकलीसना ? पण आतां मी काय करूं तें सांग. ( बसून )

पद्य. चाल.--मर्यादा सोडुनि वदणें.–धुमाळी.

तरलिके भ्रमीं मी पडलें समजेना काय करावें ॥ तूं
सखी जिवाची माझी योग्य तें मला सुचवावें ॥ जें व-
दुनि कपिंजल गेला तें मनीं सर्व आणावें ॥ चाल ॥ ज-
रि धीर लाज सोडोनी ॥ जननिंदा अवमानोनी ॥ माते-

स पित्यास न पुसुनि ॥ म्यां जाऊनि त्यासि वरावें ॥ चाल ॥
तरि अधर्म मोठा घडतो गुरुजनापमानें ठावें ॥ १ ॥

**तरलिका**--( स्वगत ) आतां यांना जरा प्रतिकूल असंच बोलून पहावं. ( प्रकाश ) ताईसाहेब, अधर्म होतो तर जाऊं नये हें चागलं.

**महाश्वेता**--अहाग वेडे ! न गेलें तर त्या कुमाराच्या विरहानं मी राहीन का जिवंत ? असो मेली, माझ्या प्राणांची मी नाहीं इतकी परवा करीत; पण माझ्या मरणानं आणखी काय अनर्थ होतील ते पहा. एक तर कपिंजलासारखा महातापसी, आजन्मात् पहिल्यानंच माझ्याकडे याचना करायला आला असून, जर मीं त्याचा अनादर केला, तर केवढं बरं पातक घडेल ? दुसरं, मी न गेल्यानं त्या प्रियकुमाराची निराशा होऊन, जर त्याच्या जिवाला कांहीं बरंवाईट झालं, तर तेंही ब्रह्महत्येचं पाप मलाच लागणार.

**तरलिका**--खरंच ताईसाहेब. तर मग आपलं पहिलं पाप पुरवलं; पण ही ब्रह्महत्या नको मेली.

**महाश्वेता**—वाहवाग ? अशीच का तूं माझ्या कुलशीलाची काळजी करणारी. ( सुस्कारा टाकून ) गडे तरलिके, ही पाहिलीस पूर्वदिशा ! माझी अशी लाजिरवाणी स्थिति पाहून मला हंसू लागली.

**तरलिका**--छे, ताईसाहेब, तुह्मांला नाहीं हंसत ती. तिचा प्रियकर चंद्र तिच्या सवतीकडे गेला होता, तो परत आला, ह्मणून हंसते आहे.

**महाश्वेता**--हा निष्ठुर चंद्रा, तूं येऊन तिचा विरहसंताप नाहींसा करणार, पण माझा अधिक होईल, हें कसं नाहीं तुझ्या ध्यानांत आलं ? तरलिके, आतां मात्र कांहीं धडगत दिसत नाहींग बाई ! ( सुस्कारा सोडून )

**पद्य. चाल.**–जो या नगरा भूषण खरा.– धुमाळी.

आधिंच मन्मथ दुःसह मला ॥ त्यांतुनि वसंत सरसावला ॥ तिसरा मलयानिल झोंबला ॥ माझ्या अंगा गे

॥ १ ॥ इतुक्यांतचि हा उगवे शशी ॥ याची पीडा साहूं कशी ॥ ज्वरितांगावरि व्हावी जशी ॥ वृष्टिच वन्हीची ॥ २ ॥ अथवा शीतार्तावरि पडे ॥ प्रभातीं हिम-जल तैसें घडे ॥ खर विष किंवा ज्याला चढे ॥ अहि त्या चावावा ॥ ३ ॥

सखे वांचीव ग वांचीव ! हा दाह माझ्यानं सोसवत नाहीं. तुझ्या मांडीवर तरी—( मूर्च्छा येऊन पडते. )

**तरलिका**—आतां काय करावं बाई ! इतक्यांत इतक्या वि-कोपाला जाईल हें ध्यानीं मनीं सुद्धां नव्हतं. ताईसाहेब, अहो ताईसाहेब ! हें काय बरं ? बोला कीं हो, मला बाई भय वाटतं.

**महाश्वेता**—( शुद्धीवर येऊन ) मी कुमाराजवळ होतें ती इतक्यांत इथें कशी आलें ? ( पाहून ) गडे तरलिके, हा चंद्र मला आतां मृत्यूसारखा दिसायला लागला. मला इथून ने कुठें तरी.

**तरलिका**—ताईसाहेब, मी आपल्याला पदर पसरून विनंति करतें, कीं पुरे आतां ही लज्जा. गुरुजनांची सुद्धां इतकी भीड ध-रून उपयोग नाहीं. कृपा करून मला पाठवा, म्हणजे मी जाऊन त्या कुमाराला इथें घेऊन येतें; नाहीं तर आपण तरी त्याच्याकडे चला खरंच सांगतें. ह्या चंद्राचा आणि मदनाचा, असे दोघां-चेही ताप सोसण्याचं आपल्या अंगांत आतां त्राण दिसत नाहीं.

**महाश्वेता**—चल तर. मला हात दे. या देहांत जीव आहे तोंपर्यंत कसं बसं त्या माझ्या प्राणवल्लभाला जाऊन भेटतें.

**तरलिका**—ही मी तयार आहें. पण प्रियजनाकडे जातांना सुगंधिक उटया, नानाप्रकारच्या उत्तम पुष्पांचे हार, त्रयोदशगुणी तांबूल, सुवासित केलेलीं वस्त्रं घेतलीं पाहिजेत. तर ही सामग्री मी घेऊन येतें.

**महाश्वेता**—बरं जा तर, लवकर ये ( **तरलिका** जाते ) आज सकाळीं माझी स्थिति काय होती आणि आतां काय झाली आहे ? मी माझ्या सख्यांना “ उपवर दशा म्हणजे काय ? आणि त्यांत

काय काय होतंग ! " असं पुष्कळ वेळ विचारलं असेल, आणि त्यांनींही " असं असं होतें " म्हणून सांगितलं असेल. पण मला तें खरं वाटत नव्हतं. आज जेव्हां त्याचा प्रत्यक्ष अनुभव आला—( **तरलिका** येते. ) आणलंस का सगळं, चल तर लवकर.

**तरलिका**—पण ताईसाहेब, आणखी कोणी परिजन नकोतका बरोबर ! किती दूर, रात्रींचं, वनांतून जायचं. भय नाहीं का वाटायचं आपल्याला ?

**महाश्वेता**—हे परिजन आहेत तर खरे. आणखी ग कशाला पाहिजेत ?

**तरलिका**—ते कोण ?

**महाश्वेता**—हें पहा.

**पद्य. चाल.**— नोहे हा पवन जवन वारु.—दादरा.

**सज्ज करुनि चाप मदन येत मागुनी ॥ मार्ग दावि इंदु मला तम निवारुनी ॥ ध्रु० ॥ जरि चंचल पद चुकतें ॥ प्रीति तया सांवरितें ॥ अग्रभागिं मन पळतें ॥ करुनि दूर शंकेतें ॥ उत्कंठा नेत पुढें धीर देउनी ॥ १ ॥**

**तरलिका**—[ हंसून ] अगबाई ! हे परिजन नवीनच ऐकले. बरं, चला तर.

**महाश्वेता**—अग, आपण या मार्गानं निघालों खऱ्या, पण कुणीं पाहिलं तर.

**तरलिका**—ताईसाहेब, हा जांभळा शेला आणला आहे, तो पांघरा म्हणजे कुण्णी ओळखणार नाहीं. ( **महाश्वेता** पांघरते. )

**महाश्वेता**—तरलिके, पुरुष पुरुषांचा कसा पक्षपात करतात, तें पाहिलंस का ! हा चंद्र मला मात्र त्या कुमाराकडे ओढून घेऊन चालला आहे; पण त्याला काग माझ्याकडे आणीत नाहीं ?

**तरलिका**—नसेल म्हणून तरी कशावरून ! पण ताईसाहेब, अशा मधेंच कां थांबलां ?

**महाश्वेता**—माझा बाई एकाएकीं हा उजवा डोळा लवायला लागला—

**पद्य. चाल.**-सोच समज नादान पियारे.- दीपचंदी.

होय मला अपशकुन असा कां ॥ उत्साहाचा भंग करी कां ॥ ध्रु० ॥ हृदयनिवासी प्राणसख्याचें ॥ अनुतापें मन पालटलें का ॥१॥ तुज फसवीलें त्या खोटीनें ॥ कपिंजलें त्या सांगितलें का ॥ २ ॥ हात सखे दे धांवत जाऊं ॥ टाकिशि तूं हीं मंद पदें कां ॥ ३ ॥

( जातात. )

---

# अंक ३ रा.

**स्थळ**—अच्छोदसरोवराजवळील लतामंडप.

**पुंडरीक**—( शिलातलावर बसलेला )

**पद्य. चाल.**—नमुनि शिवा बलवंत रची अति.- दीपचंदी.

धाडुनि दिधलें दासीसह मीं पत्र तिला करिचें या ॥ अजुनि कशी ती प्राप्त न झाली हंसकन्यका या ठाया ॥ध्रु०॥ भाव न कळला मानुं तयांतिल, आहे तरि चतुरा ती ॥ योग्य न जरि मी तत्प्रीतीला, हार कसा हा देती ॥ म्हणतिल गुरुजन काय तिला ही वागवि का मनिं भीती ॥ किंवा सखिनीं दिधलें नाहीं, अनुमत मजासि वराया ॥ १ ॥

पण प्रिये महाश्वेते, मी तुझ्यावर अनुरक्त झालों, तेव्हां मीं कठें मित्राचं अनुमोदन विचारलं, किंवा गुरुजनांची भीति मनांत आणली ? अग, खऱ्या प्रीतीपुढं असल्या प्रतिबंधांचं फारसं महत्व नाहीं, हें मी तुला आज स्वानुभवानं सांगतों. तर लौकर ये आणि माझे हे प्राण वांचीव. मित्रा कपिंजळा, तूं सुद्धां या वेळीं कुठें गेलास

वर ! मला वाटतं, औषधी आणण्याचं मिष करून तूं माझ्या प्रियेला हा सर्व वृत्तांत सांगण्याकरितां गेला असावास. असंच असेल तर मित्रा, हें तूं माझ्याकरितां फार अनुचित कर्म केलंस.

दिंडी.

बहुतपरिनें उपदेश तुवां केला ॥ परी कामांधें म्यां न आद-रीला ॥ तुझ्या स्नेहा पात्र मी नसें आतां ॥ व्यर्थ माझी वा-हसी मनीं चिंता ॥ १ ॥

प्रिय सुहृदा, तूं कदाचित् या हतभाग्याचे प्राण वांचविण्या-करितां तिची दीनजनाप्रमाणं विनवणी करशील, आणि तिनं तुझ्या विनवणीचा अनादर केला, ह्मणजे तुला मरणप्राय दुःख होईल. असं झालं ह्मणजे तुझ्या मनांत जो कांहीं माझ्याविषयीं अद्यापि थोडासा स्नेहलेश असेल, तोही नाहींसा होईल. कपिंजला, तुझ्यासारखा जन्माचा प्राणमित्र सोडून, केवळ क्षणमात्र परिचय झालेल्या गंधर्वकन्येवर लंपट होणारा असा दुष्ट, कृतघ्न, महापातकी मी ! माझ्यासाठीं इतके श्रम कशाला घेतलेस ? असो; तूं खऱ्या मित्रधर्माला जागलास, आणि मी मात्र सर्वस्वीं असन्मार्गी झालों ! पण मित्रा मी तरी काय करूं ?

( वर पाहून ) हा नष्टा दैवा ! काय माझी दशा केलीस ही ? या कामसंतापाचा कांहीं तरी उपशम व्हावा ह्मणून मीं या पुष्पित लता मंडपाचा आश्रय केला. पण माझा संताप येथें दशगुणित झाला. कारण—

पद्य. चाल.–केलीस अशी काय परीक्षा.–दादरा.

मजवरि तरु कुसुमरेणु वरुनि गाळिती ॥
मदनवशीकरणचूर्ण काय मारिती ॥ ध्रु० ॥
स्नान होत सुरतपदीं पुष्पमधुरसें ॥
चंपककलिका न तप्त मदनशर जसे ॥
मलयवात निंदी मज मधुपरवमिषें॥
सर्वचि या समयिं कसें वैर साधिती ॥ १ ॥

मला इतका वेळ आशा होती, कीं चंद्रोदय झाला ह्मणजे तरी त्याच्या अमृतवर्षी शीतल किरणांनीं माझा दाह शांत होईल; पण तीही निष्फळ झाली. आतां मात्र सुंदरि ! तुझ्यावांचून या जगत्रयांत मला तारणारा कोणी दिसत नाहीं. हे हंसकन्ये, तुजकरितां मीं माझा दुसरा प्राण अशा जन्ममित्राचा त्याग केला. तुझ्या संगतीसाठीं मीं परमपूज्य पित्याचीही भीति सोडली. तुझं मोहक दर्शन होतांच कैलासनाथाचं दर्शनही मीं तुच्छ केलं, आणखी आजपर्यंत स्वीकारलेला तपाचा गुरुनिर्दिष्ट मार्ग सोडून तुझ्या प्राप्तीच्या हेतूनं मीं हें कसं खरतर तप आचरीत आहें पहा.—

पद्य. चाल.–धन्य उषा ही बाणकन्यका.–धुमाळी.

स्मरतापाच्या घर्मजलानें स्नान सचैलाचि सारोनी ॥
कोमल कमलाचें चित्रासन रचुनि वैसलों या विपिनीं॥१॥
चंदनचर्चा, त्रिपुंड्र भाळीं, मृणालसूत्रा घालोनी ॥
कदलीदल अतिसूक्ष्म वसन हें पांघरलों स्कंधावरुनी ॥२॥
मुक्तावलिची जपमाला ही लक्ष लाविलें त्वद्ध्यानीं ॥
अनन्यगति मी शरण रिघालों इच्छा पुरवी येवोनी ॥ ३ ॥

हे निर्दये महाश्वेते, माझा संताप मस्तकांत चढला, प्राण व्याकुळ झाले, अजून किती अंत पहाणार ? तर धांव लवकर आणि मला अधरामृत पाजवून—[ दचकून ] अरे, मी माझ्या हृदयंगमेची प्रार्थना करीत असतां एकाएकीं माझे प्राण कोण आकर्षण करूं लागला ! (वर पाहून) हा अधमा, कलंक्या, चंद्रा ! ( उठून आवेशानें )

पद्य. चाल.–वायुनंदन रदन करकर चावुनी.–झंपा.

महाश्वेता न ये झडकरि ॥ ह्मणुनि असतां विकल अंतरिं ॥ प्राण हरिसी बळें निज करिं ॥ शाप तरि हा घेइं चांडाळा ॥ १ ॥ बहुत जन्मीं मृत्युलोकीं ॥ कामसुख नच लाभतां कीं ॥ मरण येइल विरहशोकीं कधिं न मिथ्या होय वाणी ही ॥ २ ॥

( विकल होऊन पडतो. )

(आकाशवाणी) "अरे, आपल्याच दोषाचीं फळं भोगणाऱ्या, विचारनष्टा, पुंडरीका,

### आर्या.

निजकर्मीं मी असतां शाप दिला त्वां मला अनपराधा ॥
घे तरि तसाच माझा मजसह सुखदुःख भोग कामांधा ॥"

पुंडरीक--(बसून) हां कठिणहृदये, गंधर्वकन्ये, या जन्मीं तर नाहींच, पण पुढच्या जन्मीं तरी माझा स्वीकार कर. (ऐकून आनंदानें) आली वाटतं. हा पावलांचा शब्द ऐकूं येतो. पण आतां येऊन काय उपयोग! कारण—

### साकी.

पाषाणापरि मस्तक झालें, स्पष्ट दिसेना कांहीं ॥
भ्रम पडलासे वाटे मतिला, अंगहि हालत नाहीं ॥
जिव्हा जड पडली ॥ प्रिये ये--

(असें ह्मणून पडतो. इतक्यांत त्याचा मित्र कपिंजल प्रवेश करितो.)

कपिंजल— (त्यास सांवरून धरून) मित्रा पुंडरीका, शुद्धीवर ये. आतां इतक्यांत महाश्वेता येऊन तुझे मनोरथ पूर्ण करील.

पुंडरीक— (डोळे उघडून आनंदानें) कुठें आहे? महाश्वेते! (त्याक्षणीं त्याचा प्राण जातो.)

कपिंजल – (कपाळ बडवून) हाय हाय! सर्वस्वी घात झाला! गेला माझा मित्र! मित्रा, मला सोडून कसा चाललास!

### पद्य. चाल.—कवणें तुज गांजियलें.–दादरा.

हा दुष्टा पंचशरा, सोडिलें नया ॥ हत्या ही घोर तुवां केलि कासया ॥ ध्रु० ॥ रे चंद्रा पापराशि, निर्लज्जा तृप्त होसि ॥ हे दक्षिणवायो, अशि वेळ साधलीस कशी ॥ मारुनि मम मित्रासी, लाभ काय सांग तुजसि ॥ तूंहि महाश्वेते, किति अससि निर्दया ॥ १ ॥

पण यांना मी काय दोष देतों? मींच स्वतः लवकर न येऊन

४

माझ्या मित्राचा प्राण घेतला. हा कृतांतरूपा कपिंजला! हीच का तुझी पुंडरीकाचे ठिकाणीं प्रीति! मित्राला वांचवून काळाची क्षुधा तूं शांत केली असतीस तर काय वाईट झालं असतं? हे कृतांता, माझ्यासारख्या पाषाणाला ठेवून या रत्नाला घेऊन गेलास, हा केवढा स्वार्थाविषयीं पक्षपात केलास? मित्रा पुंडरीका! काय केलंस हें?

## साकी.

दिसती सर्वहि शून्य दिशा या तुजविण जाऊं कोठें ॥
श्वेतकेतुला दाउं कसें मुख, संकट आलें मोठें ॥
बोलूं कवणासी ॥ दुसरा कोण सखा मजसी ॥ १ ॥

( शवास कवटाळून शोक करीत बसतो. )

**महाश्वेता**—( पडद्यांत ) सखे तरलिके, अग मागं काय राहिलीस? धांव लवकर. हा बघ कुणाचा शोकस्वर ऐकूं येतो आहे.

**कपिंजल**—मित्रा, तुझ्याकरितां मीं जाऊन त्या महाश्वेतेची विनवणी केली, ती सर्व व्यर्थ झालीना! माझ्या तर्काप्रमाणं ती जर तुझे हेतु सफल करण्याकरितां इथें आली, तर पुंडरीका, हा प्रकार पाहून तिची काय अवस्था होईल? ( कंठास मिठी मारून ) मित्रा, सर्वांचाच कसा असा घात करून चाललास!

**महाश्वेता**—( बाहेर येऊन ) अगबाई! सखे, हा कपिंजलाचा शब्दग बाई! दैवा! माझ्यापुढें काय मांडून ठेवलं आहेस कोण जाणे? तरी निघतांना मला अपशकुन झालाच होता. ( मोठ्यानें ) कोण शोक करीत आहे तें?

**कपिंजल**—( तिचा शब्द ऐकून ) शिव! शिव! ही महाश्वेताच आली!

**महाश्वेता**—महाराज, कुठें आहे माझा महाभाग कुमार?

**कपिंजल**—( मस्तक पिटून ) बाई, काय सांगूं? रोग्याचा प्राण गेल्यावर जशी त्रैलोक्यचिंतामणीची मात्रा यावी, तशी तूं आलीस. त्या निष्ठुर मदनानं सर्वथैव घात केला।

**महाश्वेता**–( **पुंडरिकाचे** ) शवाकडे पाहून जीवितेश्वरा, मुनिकुमारा, कुठें गेलास ? ( धाडकन् त्याच्या अंगावर पडते. )

**तरलिका**—( विलाससामग्री फेकून देऊन शोकानें ) ताईसाहेब—( वारा घालते. )

**महाश्वेता**—( कांहीं वेळानें मोठ्यानें ) तरलिके, कोणी शोक करित आहे, धांव लौकर. ( जरा सावध होऊन ) कुठें आहें मी ! अंधार गुहेंत शिरलें, कीं खोल पाताळांत पडलें, कांहींच कळत नाहीं. हाताला गार काय लागतं हें ? अगबाई, मी या माझ्या प्रियकराच्या शवावर पडलें आहे. आतां आठवलं सगळं ! हा दुष्टे, कपाळकरंटे महाश्वेते ! अजून कशी जिवंत राहिलीस ?

**पद्य. चाल.**—त्या मदनमनोहररूपीं.–**धुमाळी.**

**अति कठिण हृदय हें माझें ह्मणुनिच कां फुटलें नाहीं ॥ बहु पीडा सोसाया कीं आहे बळ माझ्या देहीं ॥ जन्मांतरिं पापें केलीं त्याचें हें फल का येई ॥ चाल ॥ शोकास पात्र मी ह्मणुनि ॥ दैव उलटोनि ॥ दुःख जें देई ॥ भोगाया जगलें बाई ॥ १ ॥**

**तरलिका**—ताईसाहेब, शोक करूं नका ह्मणून तरी कसं सांगूं ? पण त्या चांडाळ दैवानं घाला घातल्यावर काय करायचं आहे ? ह्मणून शोक आवरा. महाराज, आपण तरी यांना दोन शब्द सांगा.

**कपिंजल**--( न बोलतां सुस्कारा सोडून स्तब्ध बसतो.)

**महाश्वेता**—प्रियकरा, मी तुझ्यावांचून अनाथ झालेंरे ! तुझी प्रेमपत्रिका वाचतांच मी इकडे निघून आलें नाहीं, ह्मणून कारे माझ्यावर रागावून गेलास ? ( त्याच्याकडे पहातां पहातां एकदम ) अगबाई ! तरलिके, प्राण आहे ग आहे. हा पहा बोलण्याकरितां ओंठ हालवूं लागला. पाहिलंत का महाराज ? महाभागा, मला ओळखलंस का ?

**कपिंजल**--( पाहून दुःखानें ) छे, हा तुला नुसता भास झाला. अशा अगणित तरुणांचे प्राण हरण करणारा जो निर्दय मदन, त्याचं शरसंधान इतकं कसं चुकेल ?

**महाश्वेता**--खरं हो खरं. भ्रमामुळं मला तसं वाटलं. तरलिके, आतां कांहीं आशा उरली नाहीं. तो पापी काम असं कांहीं तरी करील ह्मणून मीं ह्मटलं होतं, तेंच खरं झालं शेवटीं. त्या वेळीं कुठली मला इतकी लज्जा उत्पन्न झाली होती कुणाला ठाऊक ? तरलिके, कादंबरीचा आणि माझा पूर्वीं झालेला निश्चय मी मोडायला प्रवृत्त झालें, ह्मणून दैवानं हें मला शासन केलं.

**तरलिका**--ताईसाहेब, आतां मागच्या गोष्टी आठवून कितीही आकांत केलात तरी काय उपयोग ? या का कुणाच्या स्वाधीनच्या गोष्टी आहेत ?

**महाश्वेता**--( धीरानें ) तूं ह्मणतेस तें खरं; मागच्या गोष्टी मनांत आणून कांहीं उपयोग नाहीं. पुढें काय करायचं त्याचा विचार केला पाहिजे. उगीच उशीर लावूं नये. तर मग—

पद्य. चाल.—आम्रमंजरी तुला अर्पिते.—धुमाळी.

ऊठ गडे सत्वरीं ॥ सेवा शेवटची ही करीं ॥ ध्रु० ॥
डाग नको हा वैधव्याचा ॥ मज सोसेना विरह पतीचा ॥
केला निश्चय सहगमनाचा ॥ अग्नि पेटवीं तरी ॥ १ ॥

**तरलिका**--ताईसाहेब, पण हा काय चमत्कार पाहिलात का ? एकाएकीं हा आकाशांतून अति शुभ्र वस्त्र पांघरलेला कोणी दिव्याकृति पुरुष खालीं येत आहे. तीं त्याच्या कानांत कांतिमान अशीं कुंडलं डुलत आहेत; आकृति भव्य असून उत्तम लक्षणांनीं युक्त दिसते; कंठांत नक्षत्रासारख्या मुक्ताफळांचा हार आहे. हा कोण असेल बरं ?

**महाश्वेता**--माझ्या शोकानं करुणा येऊन कुणी तरी देवलोकाहून माझ्या प्रियकराला सजीव करण्याकरितां आला असावा. चांगलं झालं बाई. आतां याचीच प्रार्थना करितें. ( वर्णन केल्याप्रमाणें एक पुरुष येऊन प्रेताजवळ उभा राहतो. ) महाराज, आपण कोण असाल ते असा. मीं आपल्याला शरण आलें आहें. मी आपली धर्मकन्या समजून मला चुडेदान द्या. या माझ्या प्रियपतीला पुनः जिवंत करून माझ्या स्वाधीन करा. ( तो कांहीं न बोलतां त्या शवास उचलून आकाशांत उडून जातो आणि वरूनच)

## ओंवी.

आइके वत्से महाश्वेते ॥ त्यागूं नकोगे प्राणातें ॥
कांहीं काळें स्वप्रियातें ॥ पावशील तूं निर्धारें ॥ १ ॥

**कपिंजल**—( रागानें ) अरे दुष्टा अंतका, माझ्या मित्राला कुठं घेऊन जातोस तें पहातों. ( असें ह्मणून त्यांच्या मागोमाग उडून जातो. **तरलिका** आणि **महाश्वेता** त्यांच्याकडे आश्चर्यानें पहात कांहीं वेळ उभ्या रहातात. )

**महाश्वेता**—ते पहा, अगदीं तारामंडळांत गेले. अगदीं दिसेनासे झाले. पण तरलिके, हा काय चमत्कार ? मला कांहीं समजत नाहीं. माझ्या मंदभाग्यानं देवांची सुद्धां बुद्धि कशी फिरली ह्मणतें ! अग, मीं त्या पुरुपाची विनंति काय केली, नी त्यानं काय केलं पाहिलंस ! सुखसंबंध नाहीं तर नाहीं; सहगमन करीन ह्मटलं, तर तेंही कपाळीं नाहीं.

**तरलिका**—ताईसाहेब, हें काय असेल तें असो; पण त्या महापुरुपानं आपल्याला पित्याप्रमाणं मोठ्या मायेनं आश्वासन दिलं तें कध्धीं खोटं व्हायचं नाहीं. ह्मणून मी आपल्याला पदर पसरून मागणं मागतें, कीं पुनः प्राणत्यागाची गोष्ट काढूं नका.

**महाश्वेता**—( स्वगत ) ही ह्मणते यांत कांहीं वावगं नाहीं. आश्वासनाप्रमाणं झालं तर उत्तमच झालं; नाहीं तर आज प्राणत्याग करायचा तो पुढं करावा. ( प्रकाश ) तुझंही ह्मणणं एका अर्थी बरं दिसतं.

**तरलिका**—उठा तर, चला घराकडे. करायचं काय ? नाशीं आलं तें मन घट्ट करून सोसलं पाहिजे. उठा.

**महाश्वेता**—घराकडे ? तें मात्र व्हायचं नाहीं. कारण,

### पद्य. चाल.—युवराज शिवाजीस सुखी.–दादरा.

मज नाहिं गडे सौख्य घरीं राहिलें जरा ॥ त्याहुनि या निर्जनवनिं वास तो बरा ॥ ध्रु० ॥ घेउनि हें पात्र, हींच माळ, वल्कलें ॥ स्नान पान साधिन गे नित्य या जलें ॥

प्रियचिंतनिं झिजविन मी शरिर आपुलें ॥ ध्यानभजनिं सुप्रसन्न करिन शंकरा ॥ १ ॥

**तरलिका**--ताईसाहेब, असं केल्यानं आईसाहेबांना, महाराजांना किती दुःख होईल बरं ! आपण एकुलत्या एक, त्यांचा सर्व जीव आपल्यावर आहे. आपल्यावांचून त्यांना कसं सुख लागेल बरं ?

**महाश्वेता**--तरलिके, आतां मला आई नको, बाबा नकोत, संपत्ति नको, सौख्य नको, कांहीं नको. माझ्या प्रियकरावांचून हें सर्व जग मला शून्य आहे. तूंच घरीं जा, आणि—आईला तसंच बाबांना हा सर्व वृत्तांत सांग आणि ह्मणावं माझ्याकरितां अगदीं दुःख करूं नका—( तिला आलिंगून ) गडे तरलिके, माझ्याप्रमाणंच त्यांचं तुझ्यावरही प्रेम आहे, ह्मणून तूं त्यांच्यापाशींच रहा; ह्मणजे तुझ्याकडे पाहून तरी त्यांना अम्मळ बरं वाटेल.

**तरलिका**—( अश्रु गाळीत ) ताईसाहेब, मी दासी झालें ह्मणून इतकी का अधम आहें ? लहानपणापासून आपल्या सेवेंत राहून अशा प्रसंगीं आपल्याला सोडून गेलें, तर अधोगतीशिवाय मला दुसरी गतिच मिळायची नाहीं. ताईसाहेब, आपला निर्धार तसा माझाही निर्धार, कीं या कुडींत प्राण आहे तोंपर्यंत मी आपल्याला सोडून जायची नाहीं.

**महाश्वेता**—बरं बाई. तुझ्याच नशिचीं दुःखं भोगायचीं असतील, तर तीं कशीं चुकणार ? चल तर. या अच्छोदतीर्थात स्नान करून त्या सकाळीं पाहिलेल्या गुहेंत जाऊं. ( मुक्ताहार, अवशिष्ट वल्कलें, कमंडलु घेऊन उठते. ) अरे चांडाळा दैवा—

पद्य. चाल.--गुणगंभीरा तूं गुणिरे.–त्रिताल.

काय तुझी निष्ठुरता ती आतां दाखवीरे ॥ धैर्यबळें सोशिन सारीं, कोण पाहुं हा रे ॥ १ ॥ योजि तीव्र शस्त्रें अस्त्रें अवघीं संग्रहींचीं ॥ दीर्घकाळ विरहीं कैसा कंठितें पहा रे ॥ २ ॥ मानुनिया दीन अनाथा अबला, एकली मी ॥ दाउं नको लेशहि माया प्रार्थितें तुला रे ॥ ३ ॥

( जातात. )

# अंक ४ था.

---

## प्रवेश १ ला.

### स्थळ—आकाशमार्ग.

(**श्वेतकेतुमुनी**चा शिष्य **मंदारक** आणि **नभःशीर्षमुनी**चा शिष्य **पद्मनाभ** असें बोलत येतात.)

**मंदारक**—त्यांत कांहीं गुह्य नाहीं. महाश्वेतेच्या विरहानं विव्हल झालेल्या पुंडरीकानं प्राणोत्क्रमणापूर्वीं चंद्राला शाप दिला; चंद्रानंही उलट पुंडरीकाला शाप दिला, तसंच पुंडरीकाचं शव घेऊन तो दिव्य पुरुष वर जात असतां कपिंजलही शोकांध होऊन त्याच्या मागोमाग गेला. मार्गांत एका आकाशसंचारी ऋषीस त्याचा धक्का लागतांच "या उद्धटपणासाठीं तूं मृत्युलोकीं अश्व होशील" असा त्यानं कपिंजलाला शाप दिला, इत्यादि वर्तमान मीं पूर्वी सांगितलं होतं, तें ध्यानांत असेलच तुझ्या !

**पद्मनाभ**—हो. तें सर्व ध्यानांत आहे; आणि त्या शापाप्रमाणं उज्जयिनीचा राजा तारापीड यास वृद्धापकाळीं जो पुत्र झाला, तोच चंद्राचा अवतार चंद्रापीड; आणि तारापीडाच्या शुकनास नामक ब्राह्मण प्रधानाला, चंद्रापीड जन्मला त्याच वेळीं झालेला पुत्र जो वैशंपायन, तोच पुंडरीक हें सुद्धां मला समजलं आहे.

**मंदारक**—झालं तर, पुढचा वृत्तांत ऐक. चंद्रापीड आणि वैशंपायन यांनीं षोडश वर्षाच्या आंतच सर्व विद्या, कला संपादन केल्या. तेव्हां तारापीडानं आपल्या पुत्राला यौवराज्याचा अभिषेक करून, त्या दोघांनाही अगणित सैन्यासहवर्तमान दिग्विजयाकरितां पाठविलं होतं. त्याप्रमाणं त्यांनीं तीन वर्षांतच आपल्या अतुल भुजप्रतापानं सर्व दिशा जिंकल्या आणि विश्रांतीकरितां सांप्रत ते कैलासाच्या पायथ्याशीं सुवर्णपुर ह्मणून किरातांचं नगर आहे तें जिंकून तिथें तळ देऊन राहिले आहेत.

**पद्मनाभ**—तर मग आतां लवकरच उज्जयिनीला परत जातील.

**मंदारक**—गेले असते; परंतु चंद्रापीड हा आज प्रातःकाळीं मृगयेकरितां आपल्या इंद्रायुध–इंद्रायुध ह्मणजे. कपिंजल–नांवाच्या अश्वावर बसून जवळच्या अरण्यांत गेला होता. तिथें एक अश्वमुखी किन्नरांचं जोडपं त्याच्या दृष्टीस पडलं. त्याच्या मागं लागून तो एकटाच चित्ररथवनासमीप आला. तिथें तें जोडपं एकाएकीं अदृश्य झालं. तेव्हां निराश होऊन, तृपानिवारणार्थ जलाचा शोध करीत करीत तो अच्छोदसरोवरीं गेला. हा वृत्तांत गुरुजींना विदित करून पुढें काय प्रकार होतो तें पाहण्याकरितां मी पुनः त्या सरोवराकडे चाललों आहें.

**पद्मनाभ**—पण कारे, चंद्रपीडाला आणि वैशंपायनाला पूर्वजन्मींचं स्मरण आहे का?

**मंदारक**—छे, शापप्रभावानं तें नष्ट झालं. बरं जातों आतां, विलंब होतो.

**पद्मनाभ**—आणखी एक शंका विचारतों. तुझ्या गुरुजींचा पुत्र पुंडरीक ह्मणजे या जन्मींचा वैशंपायन याच्याजवळ तूं असावंस, तो चंद्रपीडाकडे कां चाललास?

**मंदारक**—त्यांतील मर्म गुरुजींना माहित असेल. मला काय? त्यांची आज्ञा प्रमाण. बरं तर जातों आतां.

**पद्मनाभ**—मीही जातों. आज आमच्या गुरुजींच्या आश्रमांत मोठमोठे ऋषिवर्य मिळून वर्णाश्रमधर्माविषयीं मोठ्या कडाक्याचा वादविवाद चालायचा आहे. मला तिथें असलं पाहिजे.

( दोहों दिशांनीं दोघे जातात. )

---

## प्रवेश २ रा.

**स्थळ**–चित्ररथवनांतील अच्छोदसरोवर.

**चंद्रापीड**—अहो निरर्थक वाटणारे श्रमही दैवानुसार हितपरिणामी होतात. हेंच पहा—

## साकी.

टाकुनि सैनिक मित्रहि माझा वैशंपायन मागें ॥
अश्वमुखांच्या लोभानें मी धांवत आलों वेगें ॥
ह्मणुनिच मज दिसलें ॥ दिव्य सरोवर हें असलें ॥ १ ॥

खरोखर, हें सरोवर ह्मणजे रमणीय वस्तूंचं शिरोरत्न आहे. यांतील हें अत्यंत निर्मल उदक पाहून असा भास होतो कीं—

### पद्य. चाल.–काय मला भूल पडलि.–दादरा.

धवल चंद्रिकाच काय पूर्ण सांचली ॥ सत्पुण्यें अथवा जलरूप पावलीं ॥ ध्रु० ॥ स्फटिकशिलामंदिर हें काय भूमिचें ॥ कीं द्रवलें विमल हास्य चंद्रमौलिचें ॥ विरघळले शुभ्र मेघ काय शरदिंचे ॥ कीं निर्मळ साधुमनें सकळ वितळलीं ॥ १ ॥

असो; इंद्रायुधाला स्वच्छंदानं जलप्राशन करण्याकरितां मोकळं सोडलंच आहे; आपणही थोडंसं स्वच्छोदक सेवन करून तृप्त व्हावं. (जल प्राशन करून) अहाहा! किती मधुर, किती गार, किती सुवासिक! आज मी स्वर्गलोकीं अमृतकुंडाच्या कांठीं बसून अमृतपानच करीत आहें असं वाटतं. एका अंजुलीनंच माझी सर्व तृषा शांत झाली. आतां याच तटशिलातलावर या वासंतिलतेखालीं कमलपत्राची शय्या करून, त्यावर सूर्याचा प्रखर ताप कमी होईपर्यंत विश्रांति घ्यावी व नंतर सुवर्णपुराकडे जाणाऱ्या मार्गाचा शोध करावयास लागावं. (इतक्यांत कांहीं गीतंध्वनि ऐकून) अरे, या निर्मनुष्य वनांत वीण्याच्या झंकारानं युक्त असा हा मधुर गीतध्वनि कुणाचा बरं? अहाहा! किती मधुर! ह्मणूनच बरं—

## साकी.

कोमळ दुर्वांकुर कवलातें टाकुनि बहु उत्साहें ॥
गीतध्वनिच्या अनुरोधानें धांवति तिकडे मृग हे ॥
मार्मिक गानांचे ॥ लोकीं हेचि असति साचे ॥ १ ॥

हें समोर देवालय दिसतं, यांतून हा कर्णमनोहर ध्वनि येत

असावा. ( जवळ जाऊन आनंदानें ) अहाहा ! या देवालयाच्या मध्यभागीं जी स्त्री बसली आहे, तिचाच हा गीतस्वर. ही कोण असावी बरं ?

पद्य. चाल.–नीरक्षीरालिंगनरूपीं.–धुमाळी.

सतनु करावा पुनः मदन तो प्रार्थि शिवाला रति भासे ॥
तपःसिद्धि ही कीं गौरीची येइ पूजना या वेषें ॥ १ ॥
महामुनींची ध्यानसंपदा मूर्तिमती ही अवतरली ॥ कुसुमश्री कीं काननतरुंची स्वयें शिवार्चन करुं आली ॥ २ ॥ इंदुकरांनीं धुतली किंवा अमृतफेन इस धवल करी ॥ रजत रसानें सारविली कीं कुंदफुलांची तनु सारी ॥ ३ ॥ जणु हंसाच्या धवलपणाचा पुंज तयांना हा केला ॥ मृणालविरचित सर्वांगें कीं, श्वेतगुणा कळसचि झाला ॥ ४ ॥

पांशुपतदीक्षेचं आचरण करीत असतां ही किती सुंदर दिसते ! ही पुनः गाऊं लागली; तर इतक्यांत जवळ जाऊं नये.

**महाश्वेता—**

पद्य. चाल.–तों तननन वाजवि वेणु.– त्रिताल.

शिवशंकर गिरिजारमणा ॥ व्याघ्रांबर उरगाभरणा ॥ पदपंकजलीनोद्धरणा ॥ भवजलनिधितरणा ॥ मस्तकिं गंगा, अंकिं शुभांगा ॥ सुरनरमुनिवर वंदितचरणा, शरणा ॥ १ ॥

( पुनः ध्यानस्थ बसते. )

**चंद्रापीड—** (तिच्याकडे पहात) हिच्या आकृतीवरून, तसंच या मधुर कंठावरून ही गंधर्वकन्यका असावी असा तर्क होतो. ( ती याच्याकडे पाहते ) अहाहा ! हिची ही तपाच्या प्रभावानं गंभीर झालेली पुण्यकारक दृष्टि माझ्या अंगावर पडतांच मीं आज पवित्र तीर्थांत स्नानच केलं कीं काय असं वाटतं.

**महाश्वेता—** महाभागा ये. तुझं स्वागत असो.

**चंद्रापीड—** (जवळ जाऊन) हे भगवति ! मी प्रणाम करतों.

**महाश्वेता**-- ये, बैस. तूं कोण? या प्रदेशांत कसा आलास? कारण, या स्थळीं साधारण मनुष्याचा संचार होत नाहीं.

**चंद्रापीड**—भगवति, उज्जयिनीचे राजाधिराज तारापीड, त्यांचा पुत्र मी चंद्रापीड. संपूर्ण दिग्विजय करून हिमाचलाच्या पायथ्याशीं जें किरातांचं सुवर्णपुर आहे, तिथें सेनेसह विश्रांति घेण्याकरितां कांहीं दिवस राहिलों होतों. आज मृगयानिमित्तानं एकटाच एका अश्वमुखी जोडप्याच्या मागं लागून या सरोवरावर आलों. तिथें तुझा मधुर गीतध्वनि ऐकून इथें आलों; तों तुझं हें कल्याणकारक दर्शन झालं.

**महाश्वेता**— महाभागा, तुला फारच क्षुधा लागली असेल; पण या वनांत कंदफलांशिवाय दुसरं काय मिळणार? तूं इथेंच बैस. मी या वृक्षाचीं कांहीं मधुर फलं घेऊन येतें.

**चंद्रापीड**-- भगवति, तुझी ही शांत मूर्ति पाहून, आणि हें गौरवाचं भाषण ऐकूनच माझी क्षुधा शांत झाली. आतां मी कांहीं विचारतों तेवढं सांगून मजवर अनुग्रह कर.

**महाश्वेता**-- काय विचारतोस बाबा?

**चंद्रापीड**-- हेंच कीं,--

**पद्य. चाल.**- नाहीं कोणीही झुंगीलें.- दीपचंदी.

कोण्या मुनिचें गंधर्वांचें ॥ किंवा गुह्यक सिद्ध सुरांचें ॥
किंवा कुल तें अप्सरसेचें ॥ केलें पावन जन्मुनि सांगें ॥१॥

तसेंच-

सौख्यास्पद नवयौवन कोठें ॥ कोठें व्रत हें दुःसह मोठें ॥
लावण्याची श्री ही कोठें ॥ कोठें सांगें निग्रह ऐसा ॥२॥

आणखी ज्या पंचमहाभूतांपासून आमचीं शरीरं निर्माण झालीं, त्याच द्रव्यांचं हें तुझं शरीर असून, इतकं शुभ्र कसं?

**महाश्वेता**—महाभागा,

**पद्य. चाल.**—युवराज शिवाजीस सुखी.—दादरा.

अतिपापी मी चांडाळिण विफलजीविता ॥ निर्लज्जा नष्ट-

धवा लोकनिंदिता ॥ ध्रु० ॥ जन्मुनि जननीस मात्र व्यर्थ शिणविलें ॥ तातादिक इष्ट जना शोकिं लोटिलें ॥ ब्राह्मणवध करुनि घोर पाप जोडिलें ॥ वृत्त तिचें परिसुनि तुज लाभ कोणता ॥ १ ॥ (रडूं लागते.)

**चंद्रापीड**—(रडतेसें पाहून स्वगत) अरे! हें काय अनिष्ट झालं! आतां तर हिचा वृत्तांत ऐकण्याची मला ज्यास्त उत्कंठा लागली. (प्रकाश) भगवति, पूर्वीच्या कांहीं दुःखदायक गोष्टीचं स्मरण करवून तुला मीं शोकसंताप दिला, याची मला क्षमा कर.

**महाश्वेता**—महाभागा, जी गोष्ट निरंतर माझ्या दृष्टीपुढें उभी आहे, तिचं स्मरण कशाला करायला पाहिजे? ऐक बाबा माझी कथा. तुझ्यासारख्या सत्पुरुषाला सांगितली ह्मणजे माझ्या दुःखाचं तरी ओझं थोडं हलकं होईल.

**पद्य. चाल.**—यादवराया भाईयारे.—धुमाळी.

कुलें चतुर्दश सुरांगनांचीं, एक सुधेंतुनि उद्भवलें ॥ शशिकिरणोद्भुत दुसरें त्यांतचि, मज्जननीचें जनु झालें ॥ १ ॥
दक्षकन्यका मुनि पाहिली तशि, दुजी अरिष्टा ती प्रसवे ॥ षट्सुतरत्नें ज्येष्ठ हंस तो, सकलां ज्याचें यश ठावें ॥ २ ॥
जननी गौरी जनक हंस या दोघांपोटीं मी आलें ॥ नांव महाश्वेता हें त्यांनीं वर्ण पाहुनी सार्थ दिलें ॥ ३ ॥
शिशुत्व गेलें आनंदानें, दुःखलेश नच अनुभविला ॥ क्रमाक्रमानें तरुणदशा ये, कुसुमश्री जशि लतिकेला ॥ ४ ॥
वसंतमासीं एके दिवशीं, मातेसह या सरोवरीं ॥ स्नान कराया आलें होतें—

(रडत) देवा! तो नष्ट दिवस उगवला नसता तर फार चांगलं झालं असतं. अरे! ज्या दिवशीं लग्न त्याच दिवशीं वैधव्यराहून मला पूर्ण ग्रासून टाकलं.

**चंद्रापीड**—(मनांत) शिव शिव!

**साकी.**

शरीरधारी कोणि असो तो सुर कीं मानवयोनी ॥

विधिनियमचि हा दिसतो त्याला ग्रासावें व्यसनांनीं ॥
नाहीं तरि हीतें ॥ दुःख कदापि न संभवतें ॥ १ ॥

**महाश्वेता**—( रडें आंवरून ) पण महाभागा, ही कहाणी कांहीं थोडक्यांत आटपायची नाहीं. तूं आज सकाळपासून अगदीं उपवासी आहेस; तर आधीं इथून जवळच माझी राहण्याची गुहा आहे तिकडे माझ्याबरोबर चल, आणि उत्तम उत्तम फळं देतें तीं खाऊन तृप्त हो, आणि मग या मंदभागिनीची सर्व कथा ऐकून घे.

**चंद्रापीड**—( स्वगत ) हिचा वृत्तांत फार दुःखदायक दिसतो, आणि हिला पूर्वस्मरणानं अत्यंत शोक झाला आहे; तर आतां विशेष आग्रह करूं नये. ( प्रकाश ) भगवति, तुझ्या आज्ञेप्रमाणं यायला मी सिद्ध आहें. ( समोरून कोणी येतांना पाहून ) भगवति, हीं-एक स्त्री आणि एक तरुण पुरुष अशीं दुरून इकडे येत आहेत, तीं कोण पहा बरं.

**महाश्वेता**—( पाहून ) हं, हींच तीं माझी सखी तरलिका आणि तो माझ्या प्रियसखी कादंबरीचा वीणावाहक केयूरक.

**चंद्रापीड**—कादंबरी ही कोण ?

**महाश्वेता**—सांगतें. तुला मीं मघाशीं दक्षाची पहिली कन्या जी मुनि ह्मणून सांगितली, तिला चित्ररथ नांवाचा एक महाप्रतापी पुत्र झाला. तोच संपूर्ण गंधर्वकुलांचा अधिपति. माझा पिता हंसही याच्याच सत्तेखालीं असतो. त्याची स्त्री देवी मदिरा ही अमृतापासून जें अप्सरांचं कुल उत्पन्न झालं, त्यांत झालेली. त्यांची कादंबरी ही एकुलती एक मुलगी. तिचं आणि माझं सख्य किती ह्मणून सांगूं !

**पद्य. चाल.**—नको हरी निशिं बाहेर जाऊं.—पंजाबी.

देह मात्र तो भिन्न दिसाया, जीव एक परि दोघींचा ॥ धु० ॥ आसनशयनीं भोजनपानीं, एक ठिकाणीं बालपणीं ॥ गीतलकादिक विद्या शिकलों, खेळ खेळलों बहुपरिचा ॥ १ ॥ अशुभ वृत्त मम कळुनि तियेनें स्नेहवळें

निश्चय केला ॥ जोंवरि शोकाकुल मी तोंवरि, पाणि-
दान नच करण्याचा ॥ २ ॥

**चंद्रापीड**—याला ह्मणावं खरा स्नेह. बरं मग पुढें ?

**महाश्वेता**—पुढें काय ? हा निश्चय करूनच ती राहिली नाहीं, तर तिनं आपल्या सखिजनापाशीं असंही स्पष्ट बोलून दाखविलं, कीं जर मातापित्यांनीं बलात्कारानंच माझं कुणाशीं लग्न लावलं, तर गळफांस घेऊन, अन्नोदक सोडून अथवा अन्य कोणत्याही साधनानं प्राण देईन.

**चंद्रापीड**—शाबास गंधर्वकन्ये कादंबरी ! जशी तुझी सखी तशी तूंही स्त्रियांत धन्य आहेस. भगवति, हा तिचा निश्चय अद्यापि-ही ढळला नाहींना ?

**महाश्वेता**—छे ! आज इतकीं वर्षं झालीं, पण तिचा निश्चय होता तसा आहे. आईबापांनीं, आप्तेष्टांनीं, मैत्रिणींनीं पुष्कळ उपाय केले, पण व्यर्थ. ह्मणून काल तिच्या आईनं ह्मणजे देवी मदिरेनं मला सांगून पाठविलं कीं ‘ तुझी स्थिति अशी झाली ह्मणून आह्मी दुःखांत आहोंच आणखी कादंबरीही आपला हट्ट सोडीत नाहीं; तेव्हां तूं तरी तिला चार गोष्टी सांगून पहा.’ ह्मणून मीं आज सकाळीं तूं येण्याच्या पूर्वीं तरलिकेला कादंबरीकडे पाठविलं होतं. ती माझा निरोप तिला सांगून परत आली. पण हा केयूरक कां आला असावा कळत नाहीं.

( इतक्यांत **तरलिका** व **केयूरक** येऊन **महाश्वेतेस** सविनय प्रणाम करून, चकित मुद्रेनं **चंद्रापीडाकडे** पहात उभीं राहतात. )

तरलिके, सांगितलास का माझा निरोप कादंबरीला ? काय ह्मणाली ती ?

**तरलिका**—मीं तिला निरोप सांगितला; पण ती काय ह्मणाली तें हा केयूरकच सांगेल.

**महाश्वेता**—( स्वगत ) बहुतकरून रुचला नाहींसा दिसतो. ती जात्या फार कोवळ्या मनाची, स्नेहार्द्र असल्यामुळं असं कांहीं

तरी होईल असं मला वाटलंच होतं. (प्रकाश) कायरे केयूरका, काय म्हणाली सखी कादंबरी?

**केयूरक**-- (हात जोडून) भगवति, तुझा निरोप ऐकतांच देवी कादंबरी आधीं रडूं लागली. कांहीं वेळानं शोक आवरून संतप्त मुद्रेनं माझ्याकडे पाहून म्हणाली, 'केयूरका, तूंच जाऊन त्या निष्ठुर महाश्वेतेला उलट असें विचार कीं, तूं वनांत कष्ट भोगीत असतां मी घरीं राहून सुख भोगतें, असं समजून का हा मर्मभेदक निरोप पाठविलास?' असं म्हणून आम्हां दोघांनाही निरोप दिला.

**महाश्वेता**— (विचार करून) बरं तर केयूरका, तूं पुढें जा, आणि मीच उद्ईक सकाळीं तुझ्या भेटीला येतें आणि काय तें उत्तर देतें असं कादंबरीला सांग.

**केयूरक**-- आज्ञा प्रमाण. (प्रणाम करून निघून जातो.)

**महाश्वेता**— महाभागा चंद्रापीडा, माझी एक विनंति आहे. मान्य करशील तर सांगतें.

**चंद्रापीड**-- भगवति, काय आज्ञा आहे?

**महाश्वेता**— हें पहा, चित्ररथगंधर्वाचं वसतिस्थान हेमकूट पर्वत हा फारच रम्य आहे; तेथील राजधानीची रचनाही अलौकिक आहे; गंधर्वलोक तर तुझ्यासारख्यांनीं अवश्य पाहण्यासारखा आहे; तशीच माझी सखी कादंबरी किती सरळ स्वभावाची आणि थोर मनाची आहे म्हणून सांगूं! तिचं रूप तर इतकं मोहक आहे, कीं प्रत्यक्ष रतिही तिच्या दासीची दासीसुद्धां शोभायची नाहीं. म्हणून तुझ्या कांहीं महत्वाच्या कामांत व्यत्यय येण्याजोगा नसेल, तर माझ्याबरोबर तिथपर्यंत येऊन, सर्व चमत्कार पाहून, माझ्या सखीला भेटून तिची कांहीं समजूत पाडून, दोन तीन दिवस राहून परत यावंस, अशी माझी मोठी इच्छा आहे.

**चंद्रापीड**-- भगवति—

### साकी.

शांति, विरति, तप, निरभिमानता, शील, सरळता, शु-

चिता ॥ परमविनय, मधुभाषण ऐसी पाहुनि तव गुण-
वत्ता ॥ झालों शिष्य तुझा ॥ योजीं कवण्याही काजा ॥१॥

**महाश्वेता**— तूं माझ्या विनंतीला मान दिलास हें पाहून मला फारच आनंद झाला. बरं आतां सायंसंध्या, फलाहार इत्यादि उरकून रात्रींची रात्र इथें पल्लवशय्येवर स्वस्थ निद्रा घे. सूर्योदय होतांच इथून निघूं. मी आतां स्नान करण्याकरितां जातें. तरलिके, तूं जाऊन चांगलीं चांगलीं फळं घेऊन ये जा. आणि आल्यावर याची पल्लवशय्या तयार करून ठेव.

(दोघी निघून जातात.)

**चंद्रापीड**— अहाहा! या आजच्या आनंदजनक आश्चर्य-परंपरेचा शेवट किती गोड होणार आहे, याची कल्पनाच करतां येत नाहीं.

**पद्य. चाल.**— आतां शशिमुखिच्या विकथानिं.–त्रिवट.

मृगया वनिं करितां हयसुखयुग म्यां देखिलें ॥ ध्रु० ॥
तृषार्त फिरतां रम्य दिसे हें सहज सरोवर खासें ॥
अश्रुतमधुरध्वनि परिसुनि मग चित्तवृत्ति उल्लासे ॥
शिवमंदिरिं ही साध्वी भेटे आतां काय पुढें या ॥ १ ॥

(पडदा पडतो.)

---

# अंक ५ वा.

---

## प्रवेश १ ला.

स्थळ—कादंबरीचें अंतःपुर.

( कादंबरी आणि केयूरक बोलत असतांना पडदा उघडतो. )

**कादंबरी**—बरं, त्याचं वय किती असावं ?

**केयूरक**—तारुण्याचीं मनोहर लक्षणं त्याच्या ठिकाणीं बरींच व्यक्त दिसूं लागलीं आहेत, यावरून तो वीस किंवा एकवीस वर्षांचा असावा.

**कादंबरी**—( स्वगत ) हा पुंडरीक ह्मणावा तर आधीं महाश्वेतेचा आणि त्याचा वियोग होऊनच एकवीस वर्षं होत आलीं, तेव्हां हें कसं ? पण हा काय मी तर्क करतें ? कारण, पुंडरीकही देवलोकींचा असल्यानं आमच्याप्रमाणं त्याचंही यौवन नष्ट होण्यासारखं नाहीं. ( प्रकाश ) बरं, केयूरका, तो रूपानं कसा काय आहे ?

**केयूरक**—देवि, तो रूपानं कसा आहे हें सांगणंच अशक्य आहे; कारण त्रिभुवनसुंदर जो रतिकांत तोसुद्धां त्याच्यापुढं कुरूप दिसेल. त्याचा अंगपिंड फारच रमणीय ! तें विशाळ वक्षस्थळ, पुष्ट बाहु, सुहास्य वदन, सरळ उंच नासिका, कमलाप्रमाणं नेत्र, विस्तीर्ण भालप्रदेश—सारांश, प्रत्येक अवयव अगदीं रेखल्याप्रमाणं !

**कादंबरी**—बरं, महाश्वेता येणार आहे तिच्याबरोबर तो यईल का ?

**केयूरक**—तें मी काय सांगूं ?

( इतक्यांत **मदलेखा** सखी येते. )

**मदलेखा**—( घाईघाईनें ) देवि कादंबरी, महाश्वेता आली !

**कादंबरी**—कुठें आहे ? ( असें ह्मणून झट्कन उठून पुढें जाते; आणि **महाश्वेता** येते तीस मोठ्या प्रेमानें आलिंगन दे-

ऊन ) प्रियसखे, ये आधीं बसूं ये. तुझ्याशीं कित्ती कित्ती बोला-यचं आहे.

**महाश्वेता**—तेवढ्याकरितांच आलें आहें. चल. ( दोघी बसतात. )

**कादंबरी**--( रागानें ) पण मी तुला मोठ्या आनंदानं कड-कडून भेटलें ती काय ह्मणून ? तूं कांहीं माझी लहानपणची निष्कपट अंतःकरणाची मैत्रिण महाश्वेता नव्हेस. आतां मी तुझ्याशीं मुळीं भाषणच करायची नाहीं.

**महाश्वेता**—भाषण करणार नाहींस; मग कित्ती कित्ती बोल-णार आहेस तें कसं ?

**कादंबरी**--तुझ्यासारख्या निष्ठुर माणसाशीं बोलून करायचं आहे काय ! इतकीं वर्षं त्या वनांत राहून, दुसऱ्याचीं मर्में कशीं भेदावींत हेंच शिकलीस वाटतं ?

**महाश्वेता**--पण असं झालं काय माझ्याकडून ?

**कादंबरी**—काय झालं ह्मणून विचारते आणखी ? ' माझ्या दुःखी मनाला अधिक दुःख कां देतेस ? वडील माणसांचं ऐक. लग्न करून घे ' असा मोठ्या मायेनं मला जो निरोप पाठविलास, तो काय ह्मणून ?

**पद्य. चाल.**--मी तप्त जरी मदनशरें.–दादरा.

मज बोध करी ह्मणुनि कुणी शिकवि का तुला ॥ कीं माझा स्नेहभाव कसुनि पाहिला ॥ ध्रु० ॥ किंवा मनिं कोप धरुनि तरलिकेसवें ॥ तो निरोप मर्मभेदनासि धाडिला ॥ १ ॥

**महाश्वेता**—पण उगीच का कल्पनेवर कल्पना चालवितेस ? तुझ्याशीं असं करायचं मला कारण काय ?

**कादंबरी**—हेंच, कीं तुला वनांत टाकून, मी घरीं सुखं भोगीत राहिलें.

**महाश्वेता**—भलतंच कांहीं तरी ! हें असं माझ्या स्वप्नींसुद्धां आलं नव्हतं.

**कादंबरी**—तर मग मला लग्न कर, ह्मणून निरोप धाडलास तेव्हां हें कसं नाहीं तुझ्या मनांत आलं, कीं कारण नसतां ज्या मेल्यानं तुला विरहांत लोटलं, त्या मदनाच्या हातांत मी आपला मान पुन्हां कशी बरं देईन ?

**महाश्वेता**—( स्वगत ) जवळच आला आहे प्रसंग; बघतें आतां कशी देत नाहींस ती.

**कादंबरी**—कां ? बोलत नाहींस ? दे याचं उत्तर.

**महाश्वेता**—देईन आणखी केव्हां तरी हो. पण तुला भेटायला एक पाहुणा येणार आहे; तर आपण जाऊन तुझ्या वसंत मंदिरांत वसूं चल.

**कादंबरी**—कोण पाहुणा तो ?

**महाश्वेता**—चल तिथेंच सांगतें. ( दोघी जातात. )

( कादंबरीच्या कांहीं दासी प्रवेश करितात. )

**सर्वजणी**—

पद्य. चाल.–या डोने महाराज.–धुमाळी.

जाऊं कामाला ॥ चलाग दिवस किती आला ॥

पहिली—उपवनतरुवेलीनां जल मी घालाया जातें ॥

दुसरी—हरिणशिशूंनां कोमल पल्लव चाराया जातें ॥

तिसरी—कादंबरिची कुसुमकंचुकी गुंफाया जातें ॥

चवथी—पंजरशुकसारिकेस गायन शिकवाया जातें ॥

पांचवी—द्राक्ष जांब डाळिंब फळें मी खायाला जातें ॥

प्रत्येकजणी—चलग मीही चल येतें ॥ १ ॥

( सर्व जातात व चंद्रापीड तरलिकेसह प्रवेश करतो. )

**चंद्रापीड**—तरलिके, भगवति महाश्वेतेच्या ऋणांतून मी कसा मुक्त होईन तो होवो ! केवळ तिच्याच प्रसादानं, मनुष्याला दुर्गम असा हा गंधर्वलोक आज मला पहायला सांपडला. इथें जी जी वस्तु दृष्टीस पडते, ती ती अपूर्वच. या राजधानीची अत्यंत सुंदर रचना पाहून आमची उज्जयिनीसुद्धां मला अगदीं ओसाड दिसते.

**तरलिका**—महाराज, हेंच कन्यान्तःपुर; आंत चलाव

**चंद्रापीड**--( पुढें होऊन ) अहाहा ! तरलिके, या इतक्या तरुण कन्यका नानाप्रकारच्या मनोहर व्यवसायांत दंग होऊन इकडे तिकडे चमकत आहेत, या कोण ?

**तरलिका**—महाराज, या सगळ्या देवी कादंबरीच्या दासी आहेत.

**चंद्रापीड**--काय ? या साऱ्या कादंबरीच्या दासी ! मला तर असं वाटतं कीं—

**पद्य. चाल**–गुरुजि तुमच्या प्रीतिस.–दीपचंदी.

मिळवुनि त्रिभुवनिंच्या युवती ॥ चालवि का गणती ॥ ध्रु० ॥ काय विधाता निर्मी दुसरी ॥ स्त्रीमय ही ज-गती ॥ १ ॥ सुंदर नारिसंग्रह हा कीं ॥ स्थापी विधि सुमती ॥ राज्य स्त्रीचें किंवा येथें ॥ नाहीं पुरुष-गती ॥ २ ॥

तरलिके, रतीलाही लाजविणाऱ्या या इतक्या जिच्या दासी, ती कादंबरी केव्हां पाहीन असं झालं आहे.

**तरलिका**—महाराज, जरा पुढें चलावं. ( पुढें होतात. ) ती पहा समोर मंचकावर बसलेली.

**चंद्रापीड**—( पाहून अत्यानंदाश्चर्यानें ) अहाहा ! ब्रह्मदेवा, माझं सर्व शरीर नेत्रमयच कां केलं नाहींस ? ही केवढी चूक केली-स ? या एवढ्याशा दोन डोळ्यांनीं पाहून माझी तृप्ति कशी होणार आतां ? विधात्या ! ही तुझ्या हातची मूर्ति नव्हे. तुझ्या गुरूनं नि-र्माण केली असावी. शाबास चंद्रापीडा ! आज धन्य झालास तूं !

**पद्य. चाल**–वद जाउं कुणाला शरण.–धुमाळी.

जीं पुण्यें संपादिलीं, सर्व तीं फळलिं, याच कालीं ॥ ह्मणुनिच ही रामा दिसली ॥ १ ॥ जो निर्मी अशि सुं-दरी, तयाची खरी, कळे कुसरी ॥ उपमा इस नाहीं दुसरी ॥ २ ॥ मति पाहुनि वेडावली, वृत्तिही चळलि, दृष्टि दिपली ॥ का मोहनि मजला पडली ॥ ३ ॥

**तरलिका**—महाराज, मी जाऊन आपण आल्याचं कळवितं.

**चंद्रापीड**—ठीक आहे, कळीव.

(**तरलिका** जाऊन कळविते. दोघी उठतात. **कादंबरी**ची
आणि याची दृष्टादृष्ट होतांच दोघेंही एकमेकां-
कडे पहात उभीं राहतात.)

**महाश्वेता**—सखे कादंबरि, या, बसा, म्हण. टक लावून अशी उभी काय राहिलीस ? (स्वगत) हिचं भानच गेलं वाटतं. (प्रकाश) महाभागा ये, हीच माझी सखी कादंबरी.

**चंद्रापीड**—देवि कादंबरि, हा चंद्रापीड तुला प्रणाम करतो. भगवति, तुलाही प्रणाम करतों.

**महाश्वेता**—या सुवर्णासनावर बैस. (**कादंबरीस** हळूंच) आतां नमस्कार तरी कर.

(**कादंबरी** लाजत अस्पष्ट शब्दांनीं नमस्कार करते.)

**चंद्रापीड**—नको नको ! मला इतका मान कशाला ? देवींनं बसावं आसनावर.

**महाश्वेता**—महाभागा, तूं बैस आधीं म्हणजे बसेल ही.

(सर्व बसतात.)

**चंद्रापीड**—(स्वगत) अरे हा काय चमत्कार ! या मंदिरांत मला जिकडे तिकडे कादंबरी दिसूं लागली ! ही पहा.

**पद्य. चाल**-नोहे नारी ही चंचलवल्ली.– धुमाळी.

दिसते मणिभूवरि बिंबित झाली ॥ नागांनीं हरिली ॥
भिंती रत्नांच्या त्यांतहि गेली ॥ दिक्पालीं नेली ॥ वर-
ती मणिमंडपिं आहे भरली ॥ अमरीं उचलीली ॥ रत्न-
स्तंभीं, विमलदर्पणीं, माझ्या हृदयांतरिंही शिरली ॥१॥

**कादंबरी**—(स्वगत) महाश्वेतेनं मला तरलिकेबरोबर निरोप पाठविला, त्याच्या पूर्वीच जर या कुमाराचं दर्शन होतं, तर फार बरं झालं असतं.

**महाश्वेता**—सखे कादंबरी, या दिग्विजयी महाभागाचा वृत्तांत मीं तुला सांगितलाच आहे. सर्वसंगपरित्याग केलेली मी, पण

याच्या अंगच्या अनेक गुणांमुळं हा मला बंधूप्रमाणं प्रिय झाला, ह्मणूनच मी याला इकडे घेऊन आलें. तर जशी मी तसा हा असं समज. अधिक काय सांगूं.

**कादंबरी**—( जनांतिक ) मला कशाला इतकं सांगायला पाहिजे पण ! अगदीं थोड्या सहवासानं तुला जो बंधूप्रमाणं प्रिय झाला, तो मला नाहीं का प्रिय व्हायचा

**महाश्वेता**—तेंच मला पाहिजे आहे. ( प्रकाश ) महाभागा, तुला तर हिचा आणि माझा काय संबंध आहे, तो कळलाच आहे. ( कादंबरीस पाहून हंसत ) आतां फारसा अनुभव नसल्यानं स्वभाव जरा हट्टी आहे इतकंच.

**चंद्रापीड**—मायेच्या मनुष्याजवळ थोडासा हट्ट करणं हें एक उपवर कन्यकांना भूषणच आहे.

**महाश्वेता**—भूषणापुरताच असेल तर कांहीं वावगं नाहीं. बरं, मीं सांगितल्याप्रमाणं हा गंधर्व लोक पाहण्यायोग्य आहेना ?

**चंद्रापीड**—भगवति, हें काय विचारावं ! हा गंधर्वलोक ह्मणजे जगत्रयांतील अति मोहक वस्तूंचा संग्रहच आहे असं वाटतं. त्यांतून देवीच्या दर्शनानं तर मी भगवतीचा जन्माचा ऋणी झालों.

**कादंबरी**— सखे, आपलं दिसेल त्याची प्रशंसा करायची, हा थोरांचा स्वभावच काग ?

( कालिंदीसारिका पडद्यांतून रागानें—“ भर्तृदारिके कादंबरि, हा मेला दांडगा दुराचारी, दुष्ट शुक माझ्या पाठीस लागला आहे. त्याचं निवारण कर; नाहीं तर तुझ्याच पायाची शपथ घालून सांगतें, कीं मी कांहीं आपला प्राण ठेवणार नाहीं. ” )

**महाश्वेता**—( आश्चर्यानें ) या कन्यांतःपुरांत अशा प्रकारचा कलह कुणाचा बरं हा !

**मदलेखा**—देवी कादंबरीनं त्या परिहासशुकाचं आणि कालिंदीसारिकेचं लग्न लावून दिलं, त्यांचं भांडण हें.

**चंद्रापीड**—( आश्चर्यानें स्वगत ) या गंधर्वलोकचं सर्वच चम-

त्कारिक ! इथले हे पक्षी सुद्धां अगदीं मनुष्याप्रमाणं स्पष्ट अस्खलित भाषण करितात.

**महाश्वेता**—बरं, मग हा कलह काय ह्मणून ?

**मदलेखा**—आज सकाळीं हा शुक देवीच्या तमालिका दासी-बरोबर कांहीं बोलत होता, तें हिनं पाहिलं; तेव्हांपासून सवतिम-त्सरानं ही अगदीं संतापून गेली आहे. त्याच्याकडे पहात नाहीं, त्याच्याशीं बोलत नाहीं, जवळ जात नाहीं. कीं आह्मीं तिची पुष्कळ समजूत केली, पण ती कांहीं ऐकत नाहीं.

**चंद्रापीड**–( स्वगत ) हा प्रसंग बरा आहे बोलायला. ( प्रकाश हंसत ) खरं खरं ! पुष्कळांच्या तोंडून आह्मीं ऐकलं आहे खरं, कीं देवी कादंबरीचा परिहास नांवाचा शुक तमालिकेवर फार आसक्त झाला आहे, ही वार्ता चोहोंकडे पसरली आहे खरी; पण देवी कादंबरी आपल्या दासीला रागं भरत नाहीं हें कसं ? अथवा देवींची या बिचाऱ्या सारिकेवर माया नाहीं हेंच खरं. नाहीं तर असल्या द्वांड्या शुकाशीं तिनं तिचं लग्नच करून दिलं नसतं, नवरा जर असं करायला लागला, तर त्या बापडीनं काय करावं बरं ? त्यांतून—

**दिंडी.**

सवत असणं हें मरण बायकांना ॥
नसे याहुनि अपमान जगीं त्यांना ॥
हीच ह्मणुनि सोसोनि सर्व घेई ॥
दुजी असती तरि जीव देति डोहीं ॥ १ ॥

( सर्व हंसतात. )

( **परिहास** शुक आंतून—" अहो महाराज, कशाला घेतां इतके आयास ? माझी प्रिया कांहीं इतकी भोळी नाहीं.

**पद्य. चाल.**—शशिकुलभूषण गुणवंता.–धुमाळी.

न फसे तुह्मा ही निपुणा ॥ अथवा दुसऱ्याही कवणा ॥ ध्रु० ॥ नृपकुलसंबंधें हीतें ॥ ऐशी वक्रगिरा कळते ॥ समजे समयासमयातें ॥ कोपप्रसादहेतूतें ॥ चाल ॥ तुम-

च्या ऐशा कुटिलोक्तिस हें स्थान नव्हे जाणा ॥ यांतिल मर्म मनीं आणा ॥ १ ॥ ” )

**चंद्रापीड**—( स्वगत ) कादंबरीच्या प्रतिज्ञेला अनुसरून असं हें या परिहास शुकानं समयोचित गीत ह्मणून माझा चांगला उपहास केला. या चिन्हावरून माझ्या मनांतील आशांकुराला पाणी मिळेलसं वाटत नाहीं.

( एक वृद्ध कंचुकी येतो. )

**कंचुकी**—हे आयुष्मति महाश्वेते, महाराज आणि देवी मदिरा यांनीं तुला भेटण्याकरितां तिकडे बोलाविलं आहे.

**महाश्वेता**—असं काय. ही आलेंच ह्मणून जाऊन सांग जा.

( कंचुकी जातो. )

सखे कादंबरि, “ तुझ्या उपदेशाचं काय झालं ? ” ह्मणून त्यांनीं विचारलं तर काय सांगूं ?

**कादंबरी**—( किंचित् हंसून ) मला काय विचारतेस ? तुला बरं दिसेल तें सांग. पण हा तांबूल घे अगोदर. ( एक तांबूल घेऊन देऊं लागते. )

**महाश्वेता**—मला कशाला तापसीला ? आह्मीं सर्वांनीं मिळून या पाहुण्याचा सत्कार केला पाहिजे. ह्मणून त्याला दे—ऊठ.

**कादंबरी**—( लाजून ) मी नाहीं बाई.

**महाश्वेता**—( जनांतिक ) नाहीं ह्मणायला काय झालं ? एकदां सांगितलं, कीं याला परका समजूं नकोस. हं, दे लवकर. तो काय ह्मणेल बरं मनांत !

**कादंबरी**—पण बाई—

**पद्य. चाल.**—वृक्षवेल या दोहींची.–.पंजाबी.

या तरुणा तांबूल द्यावया लाज वाटते ॥ ध्रु० ॥ अल्पहि नाहीं परिचय याचा, प्रथम आजचि पाहिला ॥ ह्मणुनि मना धीर न होई, तूंच गडे दे हा त्यातें ॥ १ ॥

**महाश्वेता**—( हंसून मोठ्यानें ) मी काय ह्मणून देईन ? माझ्या का अंतःपुरांत आला आहे ?

**कादंबरी**--देतें बाई. पण हळू बोल. (विडा घेऊन उठते, आणि उगीच उभी राहते.)

**चंद्रापीड**--आतां मी कृतार्थ होणार! (पाहून) अहाहा!

साकी.

करकमलाच्या रक्तपणाची, तांबूलहि घे लाली ॥
तन्मिष करुनी स्वानुराग कीं, ही मज देउं निघाली ॥
लाजे कां नकळे ॥ इकडे माझा धीर गळे ॥ १ ॥

**कादंबरी**—(स्वगत) मदना, मला न विचारतां या कुमाराबरोबर माझ्या मनांत शिरून मला असं ह्मणायला शिकवितोस का! कीं—

पद्य. चाल.-कंथविन रही अकेलि.-धुमाळी.

स्वीकारी दासीस, कुमारा, स्वयें मदन दे जीस ॥ ध्रु० ॥
घर्मजलासह आत्मार्पण हें, तांबूल न हा साच ॥
करीं ठेवितें प्राण, जाण विधि शुभलग्नाचा हाच ॥ १ ॥

(नंतर महाश्वेतेनें पुनः दे ह्मटल्यावर लाजत लाजत पुढें सरून दुसरीस दृष्टि लावून तांबूल पुढें करिते.)

**चंद्रापीड**—(तांबूलास हात लावून स्वगत) अहाहा! हा हिचा करस्पर्श, कीं आनंद, कीं अमृत, किंवा चंद्रिका काहींच कळत नाहीं. हे करसंयोग करणाऱ्या तांबुला, कांहीं वेळ असाच रहा.

**महाश्वेता**—(हंसत) अग ए भ्रमिष्टे, तांबूल दे त्याला. उगीच का हात लांबवून उभी राहिलीस? (**कादंबरी** तांबूल देऊन लाजून उभी रहाते.) बरं सखे, आतां मी जातें. पण या महाभागानं कुठं रहावं बरं?

**कादंबरी**—(स्वगत) माझ्या मनोमंदिरांत तर राहिला आहे, आणखी कुठं राहणार! (प्रकाश) गडे, हें काय विचारतेस! माझं अंतःकरण-(लाजून थांबते.)

**महाश्वेता**--बोल, बोल, लाजूं नकोस.

**कादंबरी**--नाहींग, मीं ह्मटलं हें सर्व अंतःपुर कुमाराचंच आहे-

जिथें मन रमेल तिथें रहावं; हवं तर क्रीडापर्वतावरील मणिमंदिर जवळच आहे.

**महाश्वेता**—महाभागा, तुझी स्नानाची वेळ झाली असेल नाहीं?

**चंद्रापीड**—( पाहून ) खरंच! आजच्या या नयनोत्सवांत मला स्नानाचं स्मरण नाहीं.

**महाश्वेता**—केयूरका, जा. महाभागाला मणिमंदिराचा मार्ग दाखीव.

**केयूरक**—आज्ञा प्रमाण! असं इकडून यावं महाराजांनीं.

**चंद्रापीड**—भगवति, प्रणाम करतों. देवि कादंबरि, येऊं आतां? ( **कादंबरी** किंचित् हंसून, मान वळविते. ) ( स्वगत ) अहाहा!

**साकी.**

ही लज्जा, ही स्निग्ध दृष्टि, हें मधुरस्मित रमणीचें ॥
स्पर्शसमयिं तो घर्म, पुलक ते, स्खलनहि तें वाणीचें ॥
चिन्हें पाहुनि हीं ॥ येई धैर्य मना कांहीं ॥ १ ॥

( जातो. )

**महाश्वेता**—मीही जाऊन येतें बरं का.

**कादंबरी**—पण लौकर येशीलना? मला बाई एकटीला—

**महाश्वेता**—अग आत्तां येतें बघ. ( जाते. )

**कादंबरी**—( स्वगत ) आतां मी काय करूं पण? ( प्रकाश ) सखे मदलेखे, चल, आपण प्रासदावर जाऊन तिथें महाश्वेतेची वाट पहात बसूं.

**मदलेखा**—( हंसत ) हो! तिथून मणिमंदिराची शोभा चांगली दिसेल. चल तर.

**कादंबरी**—हं! समजलें. चल पुढें. ( **मदलेखा** पुढें होते. ) आज माझी चोहोंकडून हंसं होण्याची वेळ आली.

**पद्य. चाल.—बैरागी मोरे राम.—पंजाबी.**

मज मदनें फसविलें ॥ आंदोलीं बसविलें ॥ ध्रु० ॥ निश्चयवचना हृदयपटींच्या ॥ मजकरवीं पुसविलें ॥ १ ॥ त्या

तरुणाचें रूप वलानें ॥ मनिं माझ्या ठसविलं। । २ ॥ येथुनि जातां वळुनि बघे तो ॥ तेव्हांही हंसविलें ॥ ३ ॥

( जाते. )

---

## प्रवेश २ रा.

स्थळ—क्रीडापर्वतावरील मणिमंदिर.

**चंद्रापीड**--( सचिंत प्रवेश करून )

पद्य. चाल.--मज ताप मदन बहु देई.-दीपचंदी.

स्मरयौवनमद हा तरुणा करि अंधमती ॥ ध्रु० ॥ नवयुवतीचा प्रेमलवहि त्या दिसतो थोर किती ॥ १ ॥ कामदुराशा सुलभ भासवी, दुर्लभ जें जगतीं ॥ २ ॥ वृथा मनोरथ मदनहताला, व्याकुल बहु करिती ॥ ३ ॥

बरं, मीं इथें आलों त्याच दिवशीं केयूरकाला महाश्वेतेच्या आश्रमीं पाठविलं होतं. तो अद्यापि कसा परत नाहीं आला ? यावरून माझा मित्र वैशंपायन मला शोधीत सेनेसहवर्तमान भलत्याच तर मार्गानं गेला नसेलना ?

( इतक्यांत एक दासी येते. )

**दासी**—( प्रणाम करून ) महाराज, आपण मोठ्या उत्कंठेनं कालपासून ज्याची मार्गप्रतीक्षा करीत आहां, तो केयूरक आला.

**चंद्रापीड**—आला ! कुठें आहे ! आतां मीं त्याचीच आठवण काढली होती.

**दासी**--( दूर दाखवून ) तो बघावा महाराज, त्याच्याबरोबर आणखी एक स्त्री आहे.

**चंद्रापीड**--ती तर मग पत्रलेखाच असली पाहिजे. ( दुरून त्या दोघांस आनंदमुद्रेनें येतांना पाहून ) ये, ये केयूरका. पत्रलेखे, वैशंपायन सेनेसह कुशल आहेना ?

**पत्रलेखा**—सर्व कुशल आहेत महाराज.

**चंद्रापीड**—पत्रलेखे, माझा शोध तुह्मांला कसा लागला हें सांग आधीं.

**पत्रलेखा**--आपण अदृश्य झाल्यापासून, आह्मीं सर्व इंद्रायुधाच्या खुरांच्या अनुरोधानं चाललों होतों; ते काल संध्याकाळीं अच्छोदसरोवरावर येऊन पोहोंचलों. तिथें हा केयूरक भेटला. हें असूं या. पण उज्जयिनीहून लेखहराबरोबर एक कुशलपत्रिका आली आहे, तीं महाराजांनीं वाचावी अगोदर.

**चंद्रापीड**—दे दे कुठं आहे ती.

( वाचून खेदानें ) एकूण माया ही अधोवाहिनी असते, असं ह्मणतात तें खरं. माझ्यावांचून तिथें मातापितरांना चैन पडत नाहीं, आणि मला इकडच्या नादांत त्यांचं स्मरणसुद्धां होत नाहीं. असो; पित्याची आज्ञा शिरसामान्य आहे. ( पत्रिका मस्तकास लावतो. ) आतां कसंही करून देवी कादंबरीचा निरोप घेतलाच पाहिजे. केयूरका, देवी कादंबरीच्या मंदिराकडे आह्मांला घेऊन चल.

**केयूरक**—आज्ञा महाराज, असं या मार्गानं यावं. ( पुढें चालूं लागतो. )

**चंद्रापीड**— पत्रलेखे, येतां येतां अदृष्टपूर्व असा हा रम्य भूमाग पाहिलाच असशील ! चल तर.

**साकी.**

त्रैलोक्यांतिल लावण्याची खानि तूं बघशिल आतां ॥
नामें कादंबरी अनूढा, गंधर्वाधिपदुहिता ॥
तशिच महाश्वेता ॥ पतिव्रतांची जणु शुचिता ॥ १ ॥

( सर्व जातात. )

---

## प्रवेश ३ रा.

**स्थळ**–उपवनांतील हिमगृह.

( **कादंबरी, महाश्वेता** आणि **मदलेखा** प्रवेश करतात. )

**कादंबरी**—गडे तूं अगदीं बोलूं नकोस. मी मुळींच ऐकायची नाहीं. हेंचसं काय, पण—

पद्य. चाल.–तनु इंची सुंदरा–.धुमाळी.

दीन जरी जाहला, शरण ये मला, गाळी नेत्रांतुनि जारे जला, जोडुनि अंजलिही बोलला ॥ १ ॥ कथिलें त्वां प्रार्थुनी, बोलगे ह्मणुनि, तरिहिं न माझ्या वदनांतुनी, निघणें शब्दहि त्यालागुनी ॥ २ ॥

**महाश्वेता**—अग, पण त्या कुमारावर इतकी रागावलीस कां ! त्यानं तुझं असं केलं तरी काय ?

**कादंबरी**—त्या निर्लज्जानं काय केलं तें सांगायलोसुद्धां मला लाज वाटते. ही का थोरांची रीत ? का मी त्याचा चांगला पाहुणचार केला, त्याचं हें त्यानं उसनं फेडलं ?

**महाश्वेता**—पण असं केलं काय तें तरी सांग अगोदर.

**कादंबरी**—गडे महाश्वेते, तरुण पुरुषावर माझ्यासारख्या कुमारिकांनीं विश्वास ठेवूं नये, हें मला ठाऊक असून, तूं त्याची फार प्रशंसा केलीस, आपल्या बंधूसारखा आहे ह्मटलंस, ह्मणून मी त्यावावर विश्वास ठेविला; पण तो आपल्या गुणावर गेलाच शेवटीं.

**महाश्वेता**—पण काय केलंनू तें सांग ह्मणतेंना ?

**कादंबरी**—काय सांगूं !

पद्य. चाल.—व्यर्थ मि जन्मलें थोर कुळीं.–दीपचंदी.

पुरुष न नीच कुणी असला ॥ तो तूं बंधु कसा गणिला ॥ ध्रु० ॥ पाहुनि शयनीं एकलि मजसीं ॥ मंदिरीं तो शिरला ॥ १ ॥ हांसत हांसत त्या धीटानें ॥ पदर किंगे धरिला ॥ २ ॥ घर्म किती हा गालीं ह्मणुनी ॥ चुंबि बळें मजला ॥ ३ ॥

**मदलेखा**—( राग दाखवून ) हें तर मग त्यानं फारच उद्धट वर्तन केलं. पण हें तो करीपर्यंत तूं कशी मुकाट्यानं राहिलीस ?

**कादंबरी**—मुकाट्यानं का राहीन ?

पद्य. चाल.– पडतां वेणुरव कानीं.– धुमाळी.

ओरडलें किति मोठ्यानीं ॥ वदला विनोद हा रमणी ॥
ताडियलें मीं शब्दांनीं ॥ परि तो प्रेमचि तें मानी ॥
बसलें रागानें मौनी ॥ माझ्या लोळण घे चरणीं ॥चाल॥
निंदा केली बहु मीं त्याची ॥ तरि तो ऐके स्तुति
ह्मणुनी ॥ १ ॥

**मदलेखा**— पण गडे, मला एक शंका येते. तो कुमार त्या मंदिरांत आणि तूं आपल्या मंदिरांत; तेव्हां हें सगळं त्यानं केलं तरी केव्हां ? मी सारखी तुझ्या जवळ होतें, मला नाहींग दिसला तो ?

**कादंबरी**—हीच का शंका ? अहाहा ! अग शहाणे, स्वप्नांत आलेला तुलाग कसा दिसेल ?

**महाश्वेता**—( हंसत ) हं हं ! आतां जुळलं सगळं. हें तूं स्वप्नांतलं सांगितलंस.

**कादंबरी**—ह्मणून काय झालं ? स्वप्नांत येऊन तरी त्यानं असं करावं का ?

**महाश्वेता**—अग, त्या युवराजाकडे कांहीं दोष नाहीं. या सगळ्या त्या लबाड मदनाच्या चेष्टा.

**कादंबरी**—परवांपासून जेव्हां तेव्हां " या मदनाच्या चेष्टा, तो मदनाचा ताप " ह्मणून सांगतां, तर तो मदन तरी कोण आहे ?

**महाश्वेता**—सांगतें ऐक.

पद्य. चाल.– रामचंद्र नाहिं घरीं काय मी करूं.– दादरा.

अग्नि जाण हा प्रचंड अतनु पेटतो ॥ ज्वाला जरि नस-
ति तया, देह जाळितो ॥ ध्रु० ॥ धूम्ररहित असुनि पहा
अश्रु गळवितो ॥ नसुनि भस्म धवल करी निजवशासि
तो ॥चाल॥ त्रिभुवनिं यत्तापमुक्त कुणि न नांदतो ॥ १ ॥

गडे कादंबरि, तुझ्यावर नुकती कुठें त्या मदनाची छाया पडली आहे. आतां सांगितलं हें त्याचं खरं स्वरूप दूरच आहे अजून.

**कादंबरी**—( सुस्कारा टाकून ) गडे, नुसत्या छायेनंच जर माझी अशी अवस्था झाली, तर पुढें काय होईल ! ह्मणून बाई आधींच याला एखादा उपाय काढ शोधून.

**महाश्वेता**– मी कसला काढूं उपाय ! त्या कुमारालाच विचार ह्मणजे झालं.

**कादंबरी**—( रागानें ) कुमाराला विचारायचं ! मग वडील माणसं, तशाच तुह्मी मैत्रिणी कशाला हव्यात ?

**महाश्वेता**—गडे, खरं पुसशील, तर मैत्रिणी नकोत, वडील माणसं नकोत, कुणी नकोत. एकदां जिचा तिनं वर शोधून काढला, ह्मणजे मदनच सर्वांच्या ठिकाणीं होतो. तोच आई होतो, तोच बाप होतो, बंधु होतो, सर्व कांहीं तोच होतो, समजलीस !

( इतक्यांत **केयूरक** येतो. )

**केयूरक**—( दोघींस प्रणाम करून ) कुमार चंद्रापीड भेटीला येत आहे.

**कादंबरी**—गडे महाश्वेते, मी कांहीं बोलायची नाहीं हो. तूंच हवं तें बोल.

**चंद्रापीड**—( येऊन ) देवि कादंबरि, भगवति महाश्वेते, मी प्रणाम करतों.

**कादंबरी**—( स्वगत ) मूर्ति बघतांच सगळा राग नाहींसा झाला. ( उठते. )

( सर्वजण बसतात. )

**केयूरक**— देवि कादंबरि, युवराजांच्या पूर्ण विश्वासाची तांबूल-पात्र बाळगणारी ही पत्रलेखा—

**कादंबरी**—( आनंदानें ) ये पत्रलेखे, माझ्याजवळ बैस. तुझी मुद्रा पाहूनच मला आनंद झाला.

**पत्रलेखा**— देवि, जिथलं मनुष्य तिथें असलं ह्मणजे शोभतं.

**कादंबरी**— ह्मणूनच मी तुला जवळ बैस ह्मणतें. ये. ( तिचा हात धरून बसविते आणि तिला कांहीं विचारूं लागते. )

**चंद्रापीड**—( स्वगत ) हिची ही विरहस्थिति प्रत्यक्ष पाहून सुद्धां माझं अरसिक मन अजून शंका सोडीत नाहीं. धिःकार असो

याला ! ( प्रकाश ) देवि, रक्तकमलाप्रमाणं तुझे नेत्र आरक्त झाले, शरीरही निस्तेज आणि कृश दिसायला लागलं, अशी एक दोन दिवसांत तुझी स्थिति कशानं झाली बरं ?

साकी.

काय हेतु हा ताप सांग मज, व्याधिमनोभव कां हा ॥
कुसुमशयनिं तुज निजली पाहुनि मदंग जळतें पाहा ॥
वाटे तनुदानें ॥ सुखवावें तुज शशिवदने ॥ १ ॥

**कादंबरी**— ( स्वगत ) ही तिसरी भेट; पण भाषणांतला संदिग्धपणा कांहीं अजून जात नाहीं.

**महाश्वेता**— महाभागा, संतापाचं कारण ती स्वतः काय सांगेल बापडी. तिला रात्रंदिवस चैन पडत नाहीं; दिवसा सूर्य ताप देतो, आणि रात्रीं चंद्र ताप देतो. गृह सारखंच आणि हितगृह सारखंच. अंगाला थंड उट्या लाविल्या तरी अंगाची आगच होते. गार वारा घातला तरी तेंच. या स्थितींत काय करावं असं झालं आहे. तुला पाहून मात्र हिची कळी किंचित् उमलल्यासारखी दिसते.

**चंद्रापीड**— ( स्वगत ) या हिच्या भाषणावरून तर संशयाला जागाच उरली नाहीं. पण काय करूं ? वडिलांचा आज्ञालेख येऊन पोहोंचला. ( प्रकाश ) भगवति, मला पाहून जर देवीला कांहीं गुण वाटत असेल, तर मी निरंतर सन्निधच बसलों असतों; पण उपाय नाहीं.

**कादंबरी**— ( स्वगत ) ही बहुतकरून जायची प्रस्तावना दिसते.

**चंद्रापीड**— भगवति, दोन चुंबकांमध्यें सांपडलेल्या लोहखंडाप्रमाणं सांप्रत माझी स्थिति झाली आहे. कशी ती पहा—

दिंडी.

" त्वरित नगरा ये दिवस फार झाले " ॥ असें वडिलांचें पत्र मला आलें ॥ पुष्पशयनीं देवीस सोडवेना ॥
तेंवि ताताज्ञा मला मोडवेना ॥ १ ॥

अशा प्रसंगीं भगवतींनंच कांहीं युक्ति काढावी.

**महाश्वेता**—( विचार करूं लागते. )

**कादंबरी**—( स्वगत ) शेवटीं निर्दय तो निर्दयच. तीन दिवस आशा बाळगली, ती यानं तीन शब्दांनींच नष्ट केली. ( प्रकाश ) अगंबाई ! मदलेखे, एकाएकीं अंगाचा दाह व्हायला लागला, काय करूं !

**मदलेखा**—देवि चंद्रकांत मण्याची मूर्ति आणूं का ? तिला आलिंगन दे. ह्मणजे दाह कमी होईल.

**कादंबरी**—( त्रासानें ) हो, मण्याच्या मूर्तीनं दाह कमी होतो.

**महाश्वेता**—सखे कादंबरि, तुझ्या गुणपाशांत हा कुमार चंद्रापींड बद्ध झाल्यामुळं, याला बोलायला धीर होत नाहीं, ह्मणून मी बोलतें. याच्या मनांतून आपल्या विरहाकुल मातापितरांना भेटायला जायचं आहे.

**कादंबरी**—मग गडे मला काय विचारायचं त्यांत ? वडिलांना भेटायला जाऊं नये असं का मी ह्मणेन ? मदलेखे, जा. कांहीं गंधर्वकुमारांना यांच्याबरोबर जायला सिद्ध व्हा ह्मणून सांग.

( **मदलेखा** जाते. )

**महाश्वेता**—जरी दूर असलांत तरी तुह्मां उभयतांची परस्परांवर चंद्रकुमुदिनीप्रमाणं प्रीति असूं द्या म्हणजे झालं. ( **कादंबरीनं** कानांत सांगितल्यावरून ) महाभागा, सखी कादंबरीची तुला एक प्रार्थना आहे.

**चंद्रापीड**—काय आज्ञा आहे देवींची ?

**महाश्वेता**— हींच प्रार्थना, कीं तुझं दर्शन पुनरपि लौकर होईलच; पण तोंपर्यंत तुझा विरह सोसणं कठिण पडेल, ह्मणून कांहीं दिवस तरी पत्रलेखेला इथेंच ठेवावी.

**चंद्रापीड**— ठीक आहे. देवींची आज्ञा कोण मोडणार ! पत्रलेखे, तूं मोठ्या भाग्याची, ह्मणून हा देवींचा प्रसाद तुझ्यावर झाला.

( मदलेखा येऊन गंधर्वपुत्र तयार आहेत ह्मणून सांगते. ) येतों तर भगवति, देवि,

साकी.

देह चालला उज्जयिनीला, ताताज्ञा पाळाया ॥
परि मन माझें स्नेहीं गुंतुनि, सोडीना या ठाया ॥
अल्पचि काळानें ॥ होइल भेटी नियमानें ॥ १ ॥
( सर्व जातात. )

---

# अंक ६ वा.

## प्रवेश १ ला.

स्थळ–अच्छोदसरोवरावरचा लतामंडप.
( वैशंपायन आणि चंद्रापीडाच्या सेनेंतील एक मांडलिक राजा. )

**वैशंपायन**—तुम्हीं कितीही उपदेश केला तरी मी कांहीं इथून हलायचा नाहीं. तुह्मी सर्व सेना घेऊन उज्जयिनीला त्वरित चला. कारण चंद्रापीड गेल्यावर त्याचं सैन्य ठेवून घेऊन इथें राहणं तुह्मांला अगदीं योग्य नाहीं.

**मांडलिक**—( स्वगत ) आह्मी आज सतत सात दिवस सारखा उपदेश करीत असतां याचं मन वळत नाहीं, इतकं याला वैराग्य तरी कसलं झालं आहे ! ( प्रकाश ) वैशंपायना, युवराजामागं आह्मांला इथें राहणं योग्य नाहीं हें खरं; पण युवराज ह्मणजे तुझा केवळ ज्येष्ठ भ्राता, प्राणमित्र, तो तुझ्यावर मोठ्या विश्वासानं सर्व सेनाभार टाकून गेला असतां, त्याला असं फसविणं हें तुला योग्य का ?

**वैशंपायन**– हें मला समजत का नाहीं ! पण काय करूं ? सांप्रत मी सर्वस्वी पराधीन झालों आहें.

पद्य. चाल.–जातसे पतिसदनें–धमार.

चिंति मन हें कांहिं अंतरिं–अन्य विषयिं न लागतें ॥
दृष्टि गुंतलि कशावरिशी–तिथुन ती नच हालते ॥ ध्रु० ॥
हृदय जडलें कुणावरि हें–सांगतां मज येइना ॥
चरण जणुं हे बांधिले कुणि–बुद्धि गमना होइना ॥
न्याल जरि मज बळें तरि हा–प्राण पळही राहिना ॥
म्हणुनि जावें परत नगरा–वृत्त कळवा होइ तें ॥ १ ॥

**मांडलिक**—वैशंपायना, अशी भ्रमिष्टासारखी तुझी वृत्ति कां झाली ? नीट विचार कर. अजून कोणत्याही प्रकारचं संसारसुख घेतलं नाहींस; देवापितरांच्या ऋणांतून मुक्त झाला नाहींस; वंशविस्तार केला नाहींस; यज्ञयागादि करून पुण्यसंचय केला नाहींस; परलोकार्थ कोणतींही कृत्यं केलीं नाहींस; चिरस्थायी कीर्ति मिळविली नाहींस; अरे, चारींतून एकही पुरुषार्थ साधला नाहींस आणि इतक्यांतच ही वनवासाची भक्ति कोठून उत्पन्न झाली ! हा भ्रम सोडून दे. वृद्ध मातापितरांकडे पहा. तारापीड महाराजांना काय वाटेल हें लक्षांत आण. तुझ्यावांचून युवराजाची काय स्थिति होईल हें ध्यानांत घे.

**वैशंपायन**— मी कितीही बोललों, तरी तुम्हांला खरं वाटत नाहीं, तर आतां चंद्रापीडाच्याच गळ्याची शपथ वाहून सांगतों, कीं माझ्यानं हें स्थान कांहीं सोडवत नाहीं. म्हणून आतां माझी आशा सोडून तुम्हीं जावं हें चांगलं.

**मांडलिक**—झालं. आमचे सर्व उपाय थकले. यावर तुझ्या इच्छेला येईल तसं कर. आम्ही तर सर्व सेना घेऊन जातोंच; परंतु आमची एक शेवटची विनंति ऐकशील तर बरं होईल. ती हीच कीं, आम्ही तुझ्या कृतघ्नपणाचा हा सर्व वृत्तांत युवराजाला जाऊन कळवितों. फार स्नेहामुळं तो तुझी समजूत घालून तुला उज्जयिनीस नेण्याकरितां येईलच, तर तोंपर्यंत आपल्या प्राणाला अपाय होईल असं कांहीं करूं नकोस.

**वैशंपायन**—छे. छे. असं कसं करीन !

**मांडलिक**--वैशंपायना, आतां शेवटचं विचारतों. तूं आम्हां सर्वांची निराशा करणारच ना !

**वैशंपायन**—मित्रविरहामुळं आधींच मी कष्टी झालों आहे त्यांतून असे वरचेवर शब्दप्रहार कां करतां ? नगरास गेल्यावर मित्राला माझी विनंति कळवा, कीं निरुपाय होऊन मी इथें राहिलों, ह्मणून माझ्यावर रागाऊं नकोस.

**मांडलिक**—इच्छा तुझी. तुझे सेवकजन इथें ठेवतों आणि आह्मी निघून जातों. येतों तर. ( जातो. )

**वैशंपायन**—वेडा वेडाच्या भरांत, आपली कांहीं वस्तु हरवली! असं मानून तरी ती शोधीत चहूंकडे फिरतो; पण मी काय शोधीत फिरतों आहे, हें सुद्धां मला ठाऊक नाहीं. एखादं रम्य स्थल पाहून, तरुण रसिकांची वृत्ति मोहित होते, तसाही माझा प्रकार दिसत नाहीं. कारण या मनोहर वनशोभेकडे माझं लक्ष मुळींच लागत नाहीं. मात्र—

## साकी.

सरस्तटींच्या लतामंडपासन्निध धांवत जावें ॥
जगीं मित्र तो एक, तयाच्या छायेला बैसावें ॥
ऐसी फिराफिरुनी ॥ इच्छा उत्कट होय मनीं ॥ १ ॥

यावरून हा लतामंडप कोणीं मांत्रिकानं भारलेला आहे कीं काय ? हा गंधर्वलोक आहे, तेव्हां असंही संभवतं. बरं तर, चला तिकडेच जावं. एकदां परतंत्र झाल्यावर कोण कुठें नेईल तिकडे गेलं पाहिजे. ( चालून ) मी लतामंडपाच्या जसजसा जवळ जाऊं लागलों, तसतसा लोहचुंबकाप्रमाणें हा मला जास्तच आकर्षण करूं लागला. ( जवळ जाऊन ) काय चमत्कार आहे पहा, इतर लोकांना ज्या प्रियवस्तूचा विरह होतो, ती निरंतर त्यांच्या नेत्रापुढें दिसत असते; परंतु मला जिचा विरह होतो, ती काय वस्तु आहे आणि कधीं हरवली, हेंच समजत नाहीं. ( हंसून ) भ्रम ह्मणतात तो हाच.

पुरे आतां हा विचार. आज मला फारच त्रास झाला आहे; तर या मंडपांतील स्फटिकशिळातलावर कांहीं वेळ स्वस्थ विश्रांति घ्यावी. ( तसें करितो. )

( नंतर तापसीच्या वेषानें खिन्न झालेली अशी **महाश्वेता** आणि **तरलिका** येतात. )

**महाश्वेता**—तरलिके, अगदीं प्रथम ज्या दिवशीं आपण यो ठिकाणीं आलों होतों, त्या दिवशीं चतुरिकेनं सहज विनोदानं मला झटलं, कीं " कां आटपलं का नाहीं तुझं ? का वर भिळेपर्यंत इथेंच गौरीसारखी तप करीत बसणार ? " तेंच बाई खरं झालं. हा काय चमत्कार झणतें मी ?

**तरलिका**—ताईसाहेब, चमत्कार कसला ! फुलाचोलाला गांठ पडली झणायचं झालं.

**महाश्वेता**—असं कां झणतेस ? वाईट तेवढं खरं होतं. चांगलं नाहीं व्हायचं. माझं नशिबच तसं आहे. देवा ! हा माझा सारा जन्म दुःखांतच का जायचा ? स्वतःचीं दुःखं भेलीं एक वेळ पुरवलीं, पण माझ्या प्रियसखीला सुख व्हावं झणून मीं प्रयत्न केले, ते सुद्धां वायां जावेत !

**पद्य. चाल.**—वाडवडिलां सेवित जावें.—दीपचंदी.

**नाहिं माझें हित मीं केलें ॥ नाहीं सखिचें प्रिय आचरिलें ॥ नाहिं इच्छाफल तें मिळलें ॥ माझ्या करिं त्या युवराजाला ॥ १ ॥ मायबापा सखिच्या दिधलें ॥ आश्वासन तें निष्फळ गेलें ॥ ऐसि कां मी जन्मा आलें ॥ द्याया पीडा इतरांना ही ॥ २ ॥**

**तरलिका**—ताईसाहेब, नेहमीं त्याच त्याच गोष्टी आठवून दुःख करायचं तरी किती ? मी झणतें, त्या मेल्या दुःखाला तरी कसा कंटाळा येत नाहीं !

**महाश्वेता**—बाई, सुखानं का कुणी दुःख करतं ? असो; तूं गुहेंत जा आणि माझा वीणा तेवढा नीट संभाळून घेऊन ये. तों-

पर्यंत मी नित्यनियमाप्रमाणं लतामंडपांत जाऊन त्या दिव्य पुरुषाला अजून माझी दया आली कीं नाहीं तें पहातें. जा. अग तरलिके, नाहीं तर वीणा घेऊन तूं परस्पर देवळांतच जाऊन बैस; मी तिकडेच येतें.

( **तरलिका** जाते. **महाश्वेता** लतामंडपाजवळ येऊन वेलींचीं पुष्पें तोडूं लागते. )

**वैशंपायन**—( शब्द ऐकून तिला पाहून ) अरे, चंद्रावर रुसून ही चंद्रिकाच या लोकीं आली, किंवा तपाची देवता कोणा भक्ताला वर देण्याकरितां प्रकट झाली ? ( न्याहाळून ) ही पूर्वी कधीं पाहिल्यासारखी दिसते— नुसती पाहिल्यासारखी कां, हिचा आणि माझा परिचयही आसावा. पण असं आश्चर्य वाटतं, कीं हिचा आणखी माझा परिचय व्हावा कसा ? आजन्मांत या प्रदेशांत मी हा पहिल्यानंच आलों. अरे पण ही आलीच ! तर आतां आपण निद्रेचं मिष करून या शिलातलावरच पडावं; ह्मणजे मला पाहून हिचा काय ग्रह होतो तो कळेल. ( तसें करतो. )

**महाश्वेता**—आतां नित्याप्रमाणं एकदां बाहेरूनच हांक मारावी आणि मग आंत जावं. हे जीवितेश्वरा ! प्रिया पुंडरीका !

**वैशंपायन**—( स्वगत ) हा जीवितेश्वर पुंडरीक कोण ?

**महाश्वेता**—कोणी ओ देत नाहीं. ( आंत पाहून ) अग बाई ! आंत शिलातलावर कोण निजलं आहे तें ! ( आनंदानें ) त्या दिव्य पुरुषानं आपलं भाषण खरं केलं वाटतं. ( न्याहाळून ) हो. महाराज, मुखावर पदर पडला आहे, तरी तें तेज कांहीं झांकत नाहीं.

**वैशंपायन**–( स्वगत ) असो; तेज तर जुळलं; आतां पुढें पाहूं.

**महाश्वेता**–( लगबगीनें जवळ जातांच चपापून ) पण महाराज, आपलीं पूर्वीचीं जटावल्कलं जाऊन हे वस्त्रालंकार कुठले आले ?

**वैशंपायन**—काय ? पूर्वीचीं जटावल्कलं ! ( आश्चर्यानें ) मला जटावल्कलं कधीं होतीं ?

**महाश्वेता**—समजलें. मनानंच का होईना; पण माझं पाणि-ग्रहण करतांच, आपण गृहस्थधर्मी झालां असं समजून, त्या दिव्य पुरुषानं आपल्याला हीं दिव्य वस्त्राभरणं दिलीं असतील. महाराज, माझी वाट पाहून आपल्याला निद्रा लागलीना ! पण मी आलें, आतां कशाला हवी ती ?

**वैशंपायन**—तो दिव्य पुरुष कोण हें जरी माहीत नाहीं, तरी इथपर्यंत चांगलं जुळलं. आतां मुखावलोकन करून काय ह्मणते तें पाहिलं पाहिजे.

**महाश्वेता**—महाराज, ( त्याच्या तोंडावरचा पदर हातानें दूर करतांच चपापून दूर होते. ) अगबाई ! हा कोण ? हा कुणी दुस-राच तरुण, तेजस्वी ब्राह्मण आहे. तोंडवळा ओळखीचासा दिसतो; पण माझ्या प्रिय पुंडरीकाचा नव्हे हा. ( कपाळावर हात मारून ) देवा, अशा रीतीनं माझी विटंबना करण्यापेक्षां एकदम प्राण कां घेत नाहींस. ( जाऊं लागते. )

**वैशंपायन**—( उठून स्वगत ) अरे अरे ! हें सगळं फसल्यासा-रखं दिसतं ! ही जाऊं लागतांच माझे प्राणही कासावीस होऊन तिच्यामागूनच जाऊं लागले. ( प्रकाश ) छे ! छे ! कांहीं आशा धरून येणं, आणि निराश होऊन जाणं, हें कांहीं तुला योग्य नाहीं.

**महाश्वेता**—बाबारे, माझ्यासारख्या तपस्विनीला आशा काय आणि निराशा काय, एकच.

**वैशंपायन**—पण, हें तपसुद्धां तुला शोभत नाहीं. कारण को-णीही आपल्या रूपाला आणि वयाला साजेल असं आचरण केलं तरच तें श्रेयस्कर होतं. हे तरुणी,

साकी.

कंठालिंगन योग्य मालतीमृदुकुसुमाची माला ॥
तैसी तव तनु असुनि तपानें करपविसी कां तिजला ॥
विहित अशा कामीं ॥ योजी सुंदरि सुखधामीं ॥ १ ॥

**महाश्वेता**--( स्वगत ) हें याचं भलतंच अनुसंधान दिसतं. तर आतां इथें उभं राहणं चांगलं नाहीं. ओळखीचासा वाटतो, ह्मणून याचं नांव गांव विचारायचं मनांत येतं; पण नको आतां. ( जाऊं लागते. )

**वैशंपायन**--( तिच्यामागून ) तुझ्यासारख्या लावण्यलतिकेनं पूर्ण तारुण्यांत तारुण्यसुखाला विन्मुख व्हावं, हेंच विलक्षण ! असं झाल्यावर मग--

**पद्य. चाल.**--वाटे सर्वथा मुक्त झालों.--धमार.

चापा स्मर धरि व्यर्थ हातीं ॥ ध्रु० ॥ फुकट शशि उगवतो ॥ विफल मधुमास तो ॥ पुष्पपरिमलभरें पवन का वाहतो ॥ मेघही मग नभीं उगिच फिरती ॥ १ ॥

**महाश्वेता**-- ( किंचित् रोषानें ) समजलें तुमच्या मनांतील भाव. सौम्य आकृतीवरून तुमच्या मुखांतून अशा प्रकारचीं हलकीं भाषणं निघतील असं मला प्रथम वाटलं नव्हतं. असो; झालं तें झालं. आतां तरी मुकाट्यानं इथून दुसरीकडे चला.

**वैशंपायन**--छे. छे. सुंदरी, मला तूं खुशाल झिडकारून टाक; पण आपल्या यौवनावर आणि सौंदर्यावर अशी निष्ठुर होऊं नकोस. यांची मला फार कींव येते. कारण--

**पद्य. चाल.**--किति मधुर रूप तरि यांचें.--धुमाळी.

नवयौवन सुंदरता ही ॥ तनुलतासुकुसुमें पाही ॥ अति कोमल परि दोनीही ॥ लघुकाल वास त्यां राही ॥ उपभोग तयांचा कांहीं ॥ जरि समयीं घडला नाहीं ॥ चाल ॥ होय अवज्ञा विधिकरणीची ॥ पातक शिरीं अशानें येई ॥ न मिळे सुख तेंही ॥ १ ॥

( स्पर्श करण्यास हात जवळ नेत नेत ) ह्मणून ह्मणतों, सुंदरी, माझा स्वीकार करशील तर--

**महाश्वेता**--( खवळून मागें सरून ) हां! खबरदार आतां

पुढं पाऊल टाकशील तर! तरलिके, धांव लवकर, हा पहा कोण कोडगा —

**तरलिका**—( धांवत येऊन ) कोण ताईसाहेब ?

**महाश्वेता**—तरलिके, तुला येतांना पाहिलं ह्मणूनच हा वांचला; नाहीं तर अभद्र भाषणाबद्दल याला चांगलं शासन करणार होतें.

**तरलिका**--कायरे निर्लज्जा! जाणून बुजून काळसर्पिणीवर कां पाय देतोस ? चल, काळं कर इथून. ( **महाश्वेतेस** ) मी देवालयांत वीणा घेऊन गेलें, पण तुह्मी तिथें नव्हतां ह्मणून इकडे आलें, तों हा प्रकार! ( **वैशंपायनास** ) जा, निघ. उभा कां राहिला आहेस ? संभाळ पुनः इकडे आलास तर. चला ताईसाहेब आपण.

**महाश्वेता**—चल. (जातां जातां स्वगत) जरी यानं माझ्याशीं इतकं उद्धटपणाचं वर्तन केलं, तरी याला शापून दग्ध करावं असं माझ्या मनांतच येत नाहीं. मग कधीं पाहिल्यासारखा वाटतो ह्मणूनच कीं काय कोण जाणे. ( दोघी जातात. )

**वैशंपायन**—( सुस्कारा सोडून ) प्रथमग्रासालाच मक्षिकापात झाला. हिला पाहून माझ्या मनाची हुरहुर एकदम नाहींशी झाली, तेव्हां वाटलं, कीं माझ्या दुःखाचा अंत झाला; पण आतां अनुभवानं तो आरंभच ठरला. असो; आतां काय उपयोग ?

### साकी.

प्रेमसागरीं देह लोटिला तारो वा बुडवो ती ॥
परतुनि तीरावरि जायाचें नाहीं माझ्या हातीं ॥
तनुवरि या आतां ॥ वसली पूर्ण तिची सत्ता ॥ १ ॥

( जातो. )

---

## प्रवेश २ रा.

**स्थळ**—चित्ररथवन.

( तीन प्रहर रात्र चांदणी. **चंद्रापीड** प्रवासी वेषानें प्रवेश करतो. )

**चंद्रापीड**—त्या मांडलिकाच्या मुखानं माझ्या मित्राची वार्ता ऐकतांच, त्याची समजूत घालण्याकरितां वडिलांची आज्ञा घेऊन उज्जयिनीहून निघालों, तों मार्गांत फार विश्रांति न घेतां या वनांत येऊन पोहोंचलों आणि मित्राची स्थिति काय आहे ती त्याच्या सेवकांकडून गुप्त रीतीनं आधीं काढून घ्यावी, ह्मणून मीं माझा सर्व सेनापरिवार मागं ठेवून, एकटाच या सरोवराच्या कांठीं आलों. परंतु आतां मनांत अशी शंका येते, कीं—

**पद्य. चाल.**–किति गेले सुकुनि गाल.–धुमाळी.

**या आगमनाचें सार्थक होइल का ॥ मित्रोत्तम तो भेटी देइल का ॥१॥ मी करिन बोध जो ध्यानीं घेइल का ॥ वनवासाचा आग्रह सोडिल का ॥ २ ॥ जें सलतें हृदयीं दुःख निवेदिल का ॥ नगरा परतुनि मजसह येइल का ॥३॥**

( पडद्यांत–" वैशंपायन महाराज, अहो वैशंपायन महाराज ! " ) अशा वेळीं माझ्या मित्रालाच हे कोण बरं असे हांका मारीत आहेत. ( पडद्यांत– " महाराज, नित्य जागरणामुळं आमचा किंचित् डोळा लागतांच, आपण शय्येवरून उठून आलांत हें चांगलं का ? " ) हे माझ्या मित्राच्या सेवकांपैकीं कोणी तरी असून त्याला शोधीत आहेत; पण इतक्या रात्रीं तो कुठें गेला असावा ! ( मोठ्यानें ) अरे कोण रे तुह्मी ?

( दोन सेवक पुढें येतात ).

**पहिला**—अरे उद्दंडा, अंधारामुळं स्पष्ट दिसत नाहीं, पण हेच आमचे वैशंपायन महाराज. स्वर पालटून आह्मांलाच तुह्मी कोण ह्मणून विचारतात. होय, हेच. तूं पहा बरं.

**दुसरा**--महाराज, आम्हीं आपल्याला ओळखलं. ही वेळ विनोद करण्याची नव्हे. कृपा करून आतां परत चलावं. आपण नाहींसे झालां हें समजल्यापासून, सर्व सेवकांच्या जिवांत जीव नाहींसा झाला आहे.

**चंद्रापीड**--( स्वगत ) या यांच्या भाषणावरून कांहीं सुचिन्ह दिसत नाहीं. ( प्रकाश ) बाबांनो, मी वैशंपायन नव्हे. पण त्याचाच मित्र चंद्रापीड आहें.

**दोघेही**—( चपापून त्याला प्रणाम करून ) राजाधिराज, रात्रीमुळं आह्मीं आपल्याला ओळखलं नाहीं याची क्षमा व्हावी. पण इतक्या रात्रीं या वनांत एकटी स्वारी !

**चंद्रापीड**—तें मी सर्व मागाहून सांगेन. पण माझा मित्र वैशंपायन कुठें आहे तो भेटवा आधीं.

**मरुज्जव**--राजाधिराज, त्यांनाच आह्मी शोधीत आहों. आज रात्रीं नित्याप्रमाणं ते एका लतामंडपांत निजले होते, आणि जवळ जवळ साडेतीन प्रहर रात्र झाल्यावर आह्मी पहातों तों तिथें नाहींत. तेव्हांपासून सारखे त्यांना हांका मारीत या वनांतून भटकतों आहों. तरी अजून कुठें थांग नाहीं !

**उद्दंड**--मरुज्जवा, त्या गुहेकडे जाऊन पहायचं राहिलंच.

**चंद्रापीड**—ती गुहा कोणती ?

**उद्दंड**---इथून जवळच आहे महाराज. त्या गुहेंत अति सुंदर व तरुण अशी एक तापसी राहते. तिचं दर्शन झाल्यापासून वैशंपायन महाराजांची वृत्ति फार चंचल झाली आहे अलीकडे तिच्यावांचून त्यांना कांहीं दिसतच नाहीं.

**चंद्रापीड**—( स्वगत ) मला स्वप्न पडलं होतं तें आज सत्य होऊं पहातं. ( प्रकाश ) चला तर. आधीं मला त्या गुहेकडे घेऊन चला.

**सेवक**—चलावं महाराज, या मार्गानं यावं.

( जातात. )

---

## प्रवेश ३ रा.

### स्थळ.—चित्रथवन.

( निद्रेंत चालणारा **वैशंपायन** प्रवेश करतो. )

**वैशंपायन**—काय म्हटलंस ! ‘ त्या दिवशीं मला आपली ओळख न लागल्यामुळं मीं तसं निष्ठुर भाषणानं ताडन केलं, त्याची क्षमा करा ’ ! यांत कसली क्षमा ! हें पहा—

**दिंडी.**

कसें नाहीं त्वां ओळखिलें मातें ॥
ह्मणुनि विस्मित मन फार सखे होतें ॥
भाग्य माझें कीं स्मरण तुला झालें ॥
कोपवचनाचें दुःख सर्व गेलें ॥ १ ॥

आतां एकवार गाढ आलिंगन दे, ह्मणजे तर त्या दुःखाचं स्मरण सुद्धां नाहींसं होईल. काय ह्मणतेस ! नको नको ! इतक्यांत तरलिका येईल. बरोबर आहे तुझी शंका. तर मग—

**साकी.**

पावन करि हा स्कंधदेश तुज वाहुनि नेतां सखये ॥
निविड, विजन, त्या लतामंडपीं जाऊं कोणि न मग ये ॥
हें तरि रुचतें का ॥ किंवा कांहिं दुजी शंका ॥ १ ॥

काय ह्मटलंस ! ‘ अजून कांहीं चांगली खूण पटली नाहीं. ’ सुंदरी ! आतां हें ह्मणणं मी मुळींच ऐकत नाहीं, कारण—

**पद्य. चाल.—रुतला दर्भांकुर चरणीं.-धुमाळी.**

लवही धीर नसे गे मजसीं ॥ आतां अंत जरी तूं ब-
घसी ॥ न जरी पूर्णकाम मज करिसी ॥ चाल ॥ मदन
हुताशन दग्ध करिल मज तूं पाहत असतां ॥ झाला
जरि अनुताप तुला मग रक्षा ये हातां ॥ १ ॥

( मनाशीं बोलल्यासारखें ) हें माझं कठोर भाषण ऐकतांच कशी दचकली पहा ! सुंदरी, तुझं मन किती कोमल आहे, हें जाणूनच

मीं माझं खरं वृत्त तुला कळविलं. (जवळ गेल्यासारखें दाखवून) ही पहा एका गालांत हंसून तिकडे वळली!

**पद्य. चाल.—झाली सफल ही मम मनकामना.—ख्याल.**

**वायां दवडिसी काळ कां असा ॥ ध्रु० ॥ वळवुं नको मुख अंकावरि ये ॥ प्राशन करुं दे अधररसा ॥ गर्व हरूं दे त्या मदनाचा ॥ देतो पाहूं ताप कसा ॥ २ ॥ भीसि कशाला ? दूर करीं कर ॥ सोडुनि दे संकोच कसा ॥३॥**

(महाश्वेता म्हणून एका कांटेरी वेलीला आलिंगन देतो. तिचे कांटे बोचतांच जागा होऊन) अरे हें काय? अगदीं सौख्यकलशाला मी हात घालणार, तों ती सुंदरी एकाएकीं अदृश्य होऊन ही सुकलेली कांटेरी वेल माझ्या हातीं कशी आली? आणि मी लतामंडपांत निजलों होतों, तो मंडप कुठें आहे? (चोहोंकडे पाहून) समजलों काय झालं तें. त्या तपस्विनीच्या निरंतर ध्यानानं मी खराच वेडा होऊन स्वप्नांत सुद्धां भटकूं लागलों. आतां कांहीं संशय राहिला नाहीं. (सुस्कारा सोडून) हाय हाय!

**अंजनीगीत.**

**'ओळखिलें हो' मज जें वदली ॥ बहु प्रकारें ज्यां विनवीली ॥ अंकिं घेउनी हृदयीं धरिली ॥ स्वप्नचि का सारें ॥ १ ॥**

बरं, मी आतां वनाच्या कोणत्या भागांत आलों आहें? (पाहून) वाहवा! माझ्या प्रियसंजीवनीच्या गुहेसन्निध आलों. कारण हेंच तें स्थळ. बरं आतां इथून परत लतामंडपाकडे जावं, तर असाच कांहीं तरी प्रकार व्हायचा. तेव्हां आजपासून या गुहेच्या आसपास कुठें तरी रहावं. मग काय होईल तें होवो. (गुहेकडे जाऊं लागतो.) त्या सुंदरीचं दर्शन होण्यापूर्वीं माझं मन लतामंडपाकडे ओढ घेत असे; आतां गुहेकडे घेतं. (न्याहाळून) अरे, गुहेपुढें शुभ्र शिलेवर निजलेली तीच का मला वेड लावणारी सुंदरी! होय. शंका कशाला? तीच.

पद्य. चाल.–ह्रु।िहित जाहलें.—त्रिताल.

हिमधवलांगी, सूक्ष्म धवल चिर, नेसलि शशिकरतंतुरचि-
तसें ॥ ध्रु० ॥ कमलनालसम धवल करावरि ॥ धवल
पंकजापरि मुख विलसे ॥ १ ॥

ही अशी इथें एकटी निजलेली पाहून, तो घडलेला प्रकार स्व-
प्नांतला नव्हे, असा ग्रह होतो. मी अधरासव प्राशन करणार
अशा संधीला, त्या वाळलेल्या वेलीच्या आड होऊन ही चटकन्
इकडे येऊन निजली असावी. धांवत आलेल्या मनुष्याप्रमाणें ही
अति वेगानं श्वासोच्छ्वास सोडीत आहे, यावरून तर निर्णयच झाला.
(पाहून) ही पहा, मी आलों कीं नाहीं हें हळूच चोरून पाहते आहे !
पण हें माझं केवळ मनोराज्य नसेलना ! नाहीं तर मी जावं जवळ
आणि तिनं मला द्यावं झिडकारून. परंतु मी वेडा तर नव्हें—

दिंडी.

निशा रम्या ही विमल चंद्रिकेनें ॥
मीहि विव्हल अंतरीं कामबाणें ॥
विजन वनिं या एकली प्रिया रामा ॥
भीति शंका या समयिं काय कामा ॥ १ ॥

तर आतां प्रसंग पाहून जावं आणि एकदम—(पाहून दचकून)
अरे, ही उठून बसली !

**महाश्वेता**—(न्याहाळून पहात स्वगत) मघाशीं नुसता भास
झाला; पण आतां अगदीं स्पष्ट दिसायला लागला. तोच, तोच हा
कोडगा ब्राह्मणपुत्र. देवा ! मी एकटी पाहून यानं जर माझ्या
अंगाला स्पर्श केला तर काय करावं ! चंद्रापीडाकडून पत्रलेखा परत
आली कीं नाहीं, याचा शोध करून कादंबरीला इकडे घेऊन येण्या-
करितां मीं आजच तरलिकेला तिकडे पाठवून दिलं हें चांगलं नाहीं
केलं. असो; आपण उठून गुहेंत जावं, आणि दाराशीं शिला लावून
घ्यावी. (उठून गुहेकडे जाऊं लागते.)

**वैशंपायन**—( पुढें सरसावून व तिला आडवून ) छे, छे ! प्रिये, आंत चाललीस, पण या वैशंपायनाच्या प्राणाची वाट काय ?

**महाश्वेता**—( स्वगत ) हा आजचा प्रसंग कठिण आला. ( प्रकाश ) अरे, ब्राह्मणकुलांतला आहेस म्हणून मी हात जोडून तुझी प्रार्थना करतें, कीं तुझ्या अमंगल भाषणांनीं माझ्या क्रोधाची ज्वाला भडकली नाहीं तोंपर्यंत मला तरी आंत जाऊं दे, नाहीं तर तूं तरी निघून जा.

**वैशंपायन**—मी कुठें जाऊं ? माझी स्थिति तूं पहात नाहींस कांय ?

**पद्य. चाल.**—वाट तुझी आदरें पहाते बघरे.– धुमाळी.

जाळि मला चंद्र हा मित्र मदनाचा तीव्र करीं ॥ सांग दुजी कोणगे तुझ्याविण देहा शांत करी ॥ अससि तूं तापसी न कां मग ठावी नीति खरी ॥ दीन पदीं लीन हा नको करुं यास दुरीं ॥ १ ॥ ( तिच्या पायां पडतो. )

**महाश्वेता**—( त्यास पायानें झिडकारून ) हा चांडाळा !

**पद्य. चाल.**—वाहवा थोर तुं भूपाळा.–धुमाळी.

अधमा पशुसम आचरसी ॥ गम्यागम्य न तूं बघसी ॥ ध्रु० ॥ कृति सर्वहि तव शुकजातीची ॥ देहमात्र मनुजाचा ॥ मूर्ख विधाता ह्मणुनि तयानें ॥ न दिला जन्म शुकाचा ॥ १ ॥

अरे कामांधा—

होउनि शुक मग बोलतासि जरि ॥ ऐसें भलतें भलतें ॥ आला नसता कोप कुणाला ॥ लक्ष न कोणी देतें ॥२॥

**वैशंपायन**—तूं तरी सुंदरी माझ्या भाषणाकडे लक्ष कशाला देतेस ? माझ्या मनोदयाकडे दे ह्मणजे झालं.

**महाश्वेता**—थांब, पाप्या. ब्रह्मदेव करायला चुकला, तें मी करतें. ( वर पाहून ) हे सर्वसाक्षी निशानाथा,

पद्य. चाल.—पांडुनृपति जनक जया.—दादरा.

पुंडरीक म्यां वरिला ॥ याहुनि जरि अन्याला ॥ स्वप्नींही वाहियला ॥ नाहिं देह हा ॥ १ ॥ व्रत सतिचें सत्य जरी ॥ पाळियलें आजवरी ॥ शुकयोनी होउं तरी ॥ प्राप्त या खळा ॥ २ ॥

( वैशंपायन दग्ध होतो. )

**चंद्रापीड**—( पडद्यांतून ) हां, हां, भगवति महाश्वेते, माझ्या मित्राला शाप देऊं नकोस.

**महाश्वेता**—अगबाई हा कोण ? हा महाभाग चंद्रापीड आणि हा दग्ध झालेला त्याचा प्राणमित्र वैशंपायन ! हा राक्षशिणी महाश्वेते, काय केलंस हें ! आतां जर त्यानं मला येऊन विचारलं कीं " माझा मित्र कुठें आहे " तर त्याला काय सांगूं ? वैशंपायनाची ही रक्षा पाहून चंद्रापीड एक क्षणही जिवंत राहणार नाहीं ! देवा, त्याला हें काळं मुख दाखविण्यापेक्षां अच्छोदसरोवरांत जाऊन उडी टाकावी हें चांगलं.

पद्य. भैरवी.—हरि तुझि आवडि देई.— पंजाबी.

ठेऊं देह कशाला आतां ॥ ध्रु० ॥ समित्र सखिचा कांत वधोनी ॥ केली कीर्ति विशाला ॥ १ ॥ उद्धरिलीं मीं उभयकुलें तीं ॥ संपादुनि सुयशाला ॥ २ ॥ वा अच्छोदा शांत करी ही ॥ हंससुवंशमशाला ॥ ३ ॥

( जाते. )

---

# अंक ७ वा.

## प्रवेश १ ला.

स्थळ—आकाशमार्ग.

( कपिंजल आणि मंदारक येतात. )

**कपिंजल**—मंदारका, क्रुद्ध झालेल्या महाश्वेतेची ती शापोक्ति दुरूनच ऐकून, हां हा भगवती महाश्वेते, तो माझा मित्र वैशंपायन, त्याला शापूं नकोस, असं मोठ्यानं ओरडत चंद्रापीड तिथें आला; पण येऊन उपयोग काय ! तो येण्याच्यापूर्वींच वैशंपायनाच्या देहाची रक्षा होऊन गेली होती. आपल्या मित्राची ती तशी अवस्था पहातांच विद्युत्पातानं जसा एखादा प्रचंड वृक्ष कोसळून पडावा तद्वत् गतप्राण होऊन चंद्रापीड भूमीवर पडला. इतक्यांत तरलिका आणि पत्रलेखा या दोघींना समागमें घेऊन कादंबरी आली. मग काय विचारतोस ! महाश्वेतेनं जो आकांत केला, तो सांगतां येत नाहीं. इकडून वैशंपायनाचे सेवक आले; तिकडून युवराजाबरोबरचे सेवक आले; त्या सर्वांच्या शोकानं चित्ररथवनच शोक करूं लागलं असा भास झाला. कादंबरीनं सहमरणाचा निश्चय करून चंद्रापीडाचं शव मांडीवर घेतलं. तिच्या हाताचा स्पर्श होतांच, त्याच्या मुखांतून एक शीतल तेजाची ज्योती निघून गेली आणि लागलीच आकाशवाणी झाली, कीं " वत्से महाश्वेते, मीं तुला पूर्वीं आश्वासन दिलंच आहे. आतां हें माझ्याच अंशापासून उत्पन्न झालेलं कादंबरीप्रिय चंद्रापीडाचं अविनाशी शरीर शापापासून मुक्त झालं आहे, हें तुम्हांला धीर येण्याकरितां तुमच्याजवळच ठेवतों. तर याचं वायूपासून, अग्नीपासून आणि जलापासून नीट रक्षण करा. कांहीं कालानं तुम्हां दोघींचेही हेतु पूर्ण होतील. " या आकाशवाणीनं आशा उत्पन्न होऊन दोघींनींही प्राणत्यागाचा निश्चय सोडून दिला, आणि सांप्रत युवराजाच्या देहाचं रक्षण करीत दोघीही तिथेंच राहिल्या आहेत.

**मंदारक**—बरं, चंद्रापीड आणि वैशंपायन यांचे दुसरे जन्म कुठें झाले आहेत, आणि सध्यां ते कोणत्या स्थितींत आहेत ?

**कपिंजल**—ऐक. विदिशा नगरीचा सिंहासनारूढ झालेला तरुण राजपुत्र शूद्रक, अल्पकालापूर्वी अकस्मात् परलोकवासी झाला. त्याच्या देहांत प्रवेश करून चंद्र ह्मणजे चंद्रापीड सध्यां तिथें शूद्रक या नांवानंच राज्य करीत आहे.

**मंदारक**—योग्यच आहे. चंद्राला परकायाप्रवेशाची विद्या अवगत असणं, यांत कांहीं आश्चर्य नाहीं.

**कपिंजल**—तसंच, शापबलानं शुकयोनी प्राप्त झालेला माझा मित्र पुंडरीक ह्मणजे वैशंपायन हा विंध्याचलावर वास्तव्य करणाऱ्या त्रिकालज्ञ जाबाली ऋषींच्या आश्रमीं आहे. त्या महामुनींच्या मुखानं आपला सर्व वृत्तांत श्रवण करून त्याला पूर्वजन्मीचं ज्ञान आणि मनुष्यवाणी प्राप्त झाली आहे. हा नुकता कालच मी त्याला भेटून आलों.

**मंदारक**—आपल्या हातून घडलेल्या प्रमादाचा त्याला आतां फार पश्चात्ताप झाला असेल ! मनुष्यवाचा असून काया मात्र पक्ष्याची. मोठी कष्टदायक स्थिति ही ! या स्थितींत त्या बिचाऱ्याला आणखी किती दिवस लोटावे लागणार कोण जाणे ?

**कपिंजल**—त्याची शापापासून लवकर मुक्तता व्हावी ह्मणून श्वेतकेतु गुरुजींनीं कांहीं मंत्रविधि चालविला आहे. आणि त्यांनीं मला असं भविष्य सांगितलं, कीं, त्याची माता लक्ष्मी. ही भूलोकीं मातंगकन्या झाली आहे, तिच्या हातीं तो सांपडेल. नंतर ती त्याला चंद्रापीडाला ह्मणजे शूद्रकराजाला नेऊन देईल. तिथें अल्पकालपर्यंत विरहदुःख भोगून उभयतांही शापमुक्त होतील.

**मंदारक**—हें त्या महर्षींचं भविष्य सत्य झालंच पाहिजे. बरं, तूं कसा शापमुक्त झालास ?

**कपिंजल**—चंद्रापीडाचं देहावसान झालेलं पहातांच पत्रलेखेनं माझ्यासह आच्छोदसरोवरांत उडी टाकली. तेव्हां तो अश्वदेह जाऊन

मला हा पूर्वदेह प्राप्त झाला. असो; चंद्रापीडाची आणि वैशंपायनाची तशी विपरीत वार्ता, आणि त्या आकाशवाणीचं अद्भुत वृत्त श्रवण करून, त्यांचीं मातापितरं, तारापीड, विलासवती, शुकनास प्रधान आणि मनोरमा, हीं सर्व चंद्रापीडाच्या प्राणविरहित देहाचं दर्शन घेण्याकरितां महाश्वेतेच्या आश्रमीं नुकतींच गेलीं, हें गुरुजींना निवेदन करण्याकरितां मी स्वर्गलोकीं जातों.

**मंदारक**—बरं तर, मीही जातों आश्रमाकडे. ( दोघे जातात.)

---

## प्रवेश २ रा.

**स्थळ—कादंबरीच्या आश्रमासन्निध.**

( **मदलेखा** आणि **तरलिका** भेटतात. )

**मदलेखा**—तरलिके, महाश्वेतेला बोलवायला ह्मणून मी ही बाहेर पडलें आणि तूं भेटलीस. चांगला शकुन झाला. इकडे कुठें गेली होतीस !

**तरलिका**—आज ताईसाहेबांना एक स्वप्न दिसलं; त्याचं फळ काय ह्मणून आर्य शुकनासांना विचारायला गेलें होतें.

**मदलेखा**—तें कायग स्वप्न !

**तरलिका**—तें कांहीं पुसूं नकोस. त्यांनीं सांगितलं तसंच फल झालं, तर आह्मी सगळ्याजणी आनंदाच्या पुरावर तरंगायला लागूं.

**मदलेखा**—खरंच का ! मग सांगच तर काय स्वप्न दिसलं तें.

**तरलिका**—ऐक. प्रत्यक्ष महेश्वर पार्वतीमातेसहवर्तमान ताईसाहेबांच्या स्वप्नांत येऊन ह्मणाले, " मुली, तुझ्या तपाचरणानं मी संतुष्ट झालों. तुझे कष्ट सर्व संपले. यापुढें पतिसहवर्तमान चिरकाल सुखांचा उपभोग घे ! "

**मदलेखा**—प्रत्यक्ष महेश्वरांनीं हें सांगितलंना !

**तरलिका**—आधीं ऐक तरी सगळं. इतक्यांत पार्वतीमातेनं ताईसाहेबांना कुंकूं लावून सौभाग्यवस्त्रं परिधान करायला दिलीं. इतकं पाहून त्या जाग्या झाल्या आणि मला हांक मारली.

**मदलेखा**—फार चांगलं झालं बाई! महाश्वेतेचे कष्ट संपले ह्मणजे कादंबरीचेही संपलेच ह्मणायचे. बरं आतां तूंच जा आणखी आज कामदेवाचा उत्सव ह्मणून कादंबरीनं चंद्रापीडमहाराजांची पूजा बांधली आहे, ती पहायला तुला बोलावलं आहे, असं महाश्वेतेला सांग; आणि तूंही ये बरं का. मी जातें तर आतां.

**तरलिका**—आत्तां घेऊन येतें त्यांना. (दोघी जातात.)

(पूजा बांधून पर्यंकावर बसविलेल्या **चंद्रापीडा**जवळ **कादंबरी** आणि **मदलेखा** बोलत उभ्या आहेत असा प्रवेश होतो.)

**कादंबरी**—सखे मदलेखे, आज मी कोणत्या कामदेवाची पूजा करणार आहें समजलीस का? हें पहा.

**पद्य. चाल.**—पाहिन सिंहासनिं राम कधीं मी.–धुमाळी.

तिलक कपाळीं उटि सर्वांगीं, मीं नाथाच्या लाविली ॥ ध्रु० ॥ मुकुट शिरीं पुष्पांचा, श्रवणीं अशोकसुमनें वाहिलीं ॥ सशर कुसुमधनु दिधलें हातीं, कंठीं माला घातली ॥ १ ॥ कामदेव हा माझा, नलगे मूर्ति चित्रिं जी रेखिली ॥ प्रसादकारी स्मरशतसुंदर, हीच आवडे चांगली ॥ २ ॥

(चित्र दाखवून) या दोहोंमध्यें तुला कोणती चांगली दिसते सांग बरं?

**मदलेखा**—(पाहून हंसत) हें काय विचारतेस? अग, चित्र तें चित्रच. चित्राच्यानं प्रत्यक्ष मदनाची बरोबरी करवेल कशी?

**कादंबरी**—अग हो, पण अगदींच विसरलें. तो मुक्ताफलांचा हार कुठें घातला आहे अजून. त्याशिवाय शोभाच नाहीं. (हार घेऊन) महाराज, आपण माझ्या क्रीडापर्वतावरील मंदिरांत असतांना, हा हार मीं या मदलेखेबरोबर भेट ह्मणून आपल्याला पाठविला होता, तो मी आज स्वतः आपल्या कंठांत घालतें. (तसें करून त्याच्या मुखाकडे पहात) कायग मदलेखे, "कादंबरीच्या इतक्या मानाला मी पात्र नाहीं" असं आतां नाहीं कुठें ह्मटलं? तर त्या दिवशीं मला खोटंच सांगितलंस वाटतं?

**मदलेखा**—त्या दिवशीं मीं दिला, ह्मणून तसं ह्मटलं असेल.

**कादंबरी**—( कांहीं ऐकून ) अग, ही कोकिला रात्रींची सुद्धां काय ह्मणून गाते बाई ?

**मदलेखा**—आधींच या वसंतऋतूंत आम्रासव पिऊन मत्त झालेली, त्यांतून तूं ही रात्रीं पूजा बांधलीस, ह्मणून ती कामदेवाचा स्तुतिपाठ करीत आहे, समजलीस.

**कादंबरी**—आणखी काय राहिलं बरं आतां ?

**मदलेखा**—( चित्राकडे पाहून ) गडे कादंबरी, आणखी एक मोठी चूक राहिली आहे. पण रागावणार नाहींस तर सांगतें.

**कादंबरी**—( स्वगत ) आतां ही कांहीं तरी विनोद करणार. ( प्रकाश ) नाहीं रागवायची. सांग काय राहिलं तें ?

**मदलेखा**—हें पहा, या चित्रांतल्या कामदेवाच्या अंकावर रति बसलेली आहे; आणखी या कामदेवाच्या अंकावर कुणीच नाहीं, ह्मणून हा कसा अगदीं ओका ओका दिसतो बाई.

**कादंबरी**—( लाजून ) काय लचाड आहेसग ? बरं, जा आणि महाश्वेता अजून आली नाहीं, तिला घेऊन ये पूजा बघायला. तिला हें सांगूं नकोस आधीं, बरं का.

**मदलेखा**—पण महाश्वेता येईपर्यंत तरी कामदेवाच्या अंकावर रति बसेलना ? ( हंसत जाते. )

**कादंबरी**—माझ्या मनांत होतं तेंच सुचविलं हिनं. ( कांहीं वेळ चंद्रापीडाकडे पहात सुस्कारा सोडून ) महाराज आपल्या हातांत मीं हें बाणासहित पुष्पाचं धनुष्य दिलं, तें माझ्यावरच का ओढण्याकरितां ? नको नको. मी आपल्याला शरण आलें. आधींच—

**पद्य. चाल.**—बाला प्रीतकरो मनें परिहारीरे.—दादरा.

मज गानिं करी व्याकुळ ही कोकिळा ॥ पवनाहि हा झोंबाया लागला ॥ शर तीव्र असे मजवरि कां सोडितां ॥<br>
कसे साहुं हो, अबला मी कोमला ॥ १ ॥

महाराज, आणखी वर हंसायचं का ?] एकूण पुरुष निर्दय ह्मण-

तात तें खरं. ही काय खूण केली ? इतकंचना ? आपली मर्जी असेल तर मांडीवर बसतें. ( जवळ जाऊन कांहीं ऐकलेंसें करून चट्कन् मागें सरते. ) वाहवाग मद्लेखे ! मी कांहीं अंकावर बसायला जात नव्हतें. तें उजव्या कानावरचं फूल जरा वांकडं बसलं आहे, तें नीट करणार होतें. ( कोणी नाहींसें पाहून हंसत ) पण मी लाजलें कुणाला ? इथें आहे कुठें मद्लेखा ? चोराच्या मनांत चांदणं ह्मणतात तसं झालं हें. आतां जवळ तरी जाऊन बसावं. पण मी जवळ कशी शोभतें हें मला कसं कळणार ? आहा ! हा आरसा घ्यावा हातांत ह्मणजे झालं. ( जवळ बसून आरशांत पाहून आरसा खालीं ठेवून ) इतका वेळ कल्पनेचे कामदेव, कल्पनेची रति, कल्पनेचीच पूजा, असं होतं, पण आतां मात्र माझं देहभान अगदीं गेलं. ( डोळे मिटून त्यास गाढ आलिंगन देते. **चंद्रापीड** सजीव होतो.)

**चंद्रापीड**—आर्द्र कमलिनीच्या देठांनीं मला कोणीं बांधलं आहे ! ( पाहून ) अहाहा ! माझीच प्रिया ही ! ( तिला आलिंगन देऊन ) शाबास दैवा. आतां काय–

### साकी.

अचिंत्य, अनुपम, सदा नविन जें प्राप्य सुयत्नीं बहुतीं ॥
ब्रह्मानंदादिक, सुरसिक जें नव नारीनर गणिती ॥
तें सुख इजसंगीं ॥ आतां सेविन बहु रंगीं ॥ १ ॥
प्रिये, नेत्र उघडून पहा.

**कादंबरी**–-( पाहून ) अगबाई ! ( लाजून बाजूस उभी राहते. )

**चंद्रापीड**—आतां कां बरं ही लाज ? त्या चित्रांत कामदेवाला लाजून, रति अशी का दूर उभी राहिली आहे ?

**कादंबरी**–-( लाजून ) तर मग आपण सावध असून, माझा इतका वेळ अंत पाहिला वाटतं ?

**चंद्रापीड**—छे, छे, प्रिये, तूं मला आतां प्रेमालिंगन दिलंस त्यानंच मी सजीव झालों. परंतु तुझ्या मनांतील सर्व मीं अंतःसाक्षित्वानं जाणलं. मी कोण, काय, हें तुला कपिंजलानं सांगितलंच आहे.

**कादंबरी**—तें सर्व कळलं. पण मी आपल्याशीं बोलतें हीच चूक. त्या दिवशीं हिमगृहांतून संदिग्ध भाषण करून निघून गेलेले मला आठवतं अजून.

**चंद्रापीड**—भलतंच कांहीं तरी. त्या दिवशीं तसं भाषण करण्याचं कारण ' महाश्वेता दुःखांत आहे तोंपर्यंत पाणिदान करायचं नाहीं, ' ही तुझी प्रतिज्ञाच होय. त्यांत माझ्याकडे कोणता दोष !

**कादंबरी**—मग आतां झालं का तिचं दुःख नाहींसं ?

**चंद्रापीड**—हो. पुंडरीक आणि मी दोघेही नुकतेच शापमुक्त झालों. तो माझ्या चंद्रलोकांतून उतरून महाश्वेतेच्या आश्रमाकडे गेला आणि मी—

**मदलेखा**—(धांवत येते) गडे कादंबरी! एक मोठी आनंदाची गोष्ट सांगतें. ( **चंद्रापीडास** पाहून आनंदानें लाजून उभी राहते. )

**कादंबरी**—ती काय ग ?

**मदलेखा**—तुझ्या मैत्रिणीच्या तपाचं सार्थक झालं ! पुंडरीक आला.

**कादंबरी**—( अत्यानंदानें ) खरंच का ? तर मग आधीं जाऊन महाश्वेतेला भेटलं पाहिजे.

**मदलेखा**—पण तीच पुंडरीकासह तुला भेटायला धांवत इकडे येत आहे. ती पहा—

( **पुंडरीक** आणि **महाश्वेता** येतात. **पुंडरीक** **चंद्रापीडाला** आणि **महाश्वेता** **कादंबरीला** कडकडून भेटतात. इतक्यांत **कपिंजल** आणि **तरलिका** येतात. )

**कपिंजल**—( सानंद ) फार विरहदुःख भोगून परिणामीं पूर्ण मनोरथ होणाऱ्या माझ्या उभय मित्रांचा विजय असो.

( पडद्यांत—" कुठें आहे माझा वत्स **चंद्रापीड** ? " " कुठें आहे बाळ **वैशंपायन** ? " )

**तारापीड**—अहो, आर्य शकुनास, हे पहा चित्ररथराज आणि हंसराज आले ! यावं यावं गंधर्वराज ! ( सामोरे जाऊं लागतात. )

**चित्ररथ** आणि **हंसराज**—( सानंद ) छे, छे, आह्मीं कन्या-पक्षाचे; आम्हांला कशाला इतका मान ! असो; आधीं आपल्या आज्ञेनं हें करतों. वत्से कादंबरी, ये इकडे. महाश्वेते, तूं इकडे ये. युवराजा चंद्रापीडा, मंत्रिपुत्रा पुंडरीका--

साकी.

मम कन्या ही स्वयें वरी तुज, पाणिग्रह करिं हीचा ॥
निपुत्रिका मज तूंचि पुत्र हो, भारहि घे राज्याचा ॥

**चंद्रापीड व पुंडरीक**—

आज्ञा वडिलांची ॥ शिरसावंद्य असे साची ॥ १ ॥

( पाणिग्रहण करून सर्व वडिलांस नमस्कार करतात. ते "आयुष्मान् भव, कीर्तिमान् भव, शतपुत्रवती भव," असे आशीर्वाद देतात. )

**कपिंजल**—आज श्वेतकेतुमहर्षींच्या प्रसादानं सर्वांची इच्छा पूर्ण झाली. मित्रा चंद्रापीडा, आणखी कांहीं इच्छा आहे ?

**चंद्रापीड**—त्यांच्या कृपेनं आमचे सर्व हेतु सफल झाले; तथापि आणखी हें होवो,—

पद्य. चाल.--प्रिये पहा रात्रीचा समय सरुनि.–दादरा.

उगवो तो वैभवरवि पुनरपि या आर्यभूवरी ॥ ध्रु० ॥ आ-लस्या स्थान नुरो ॥ उद्यम साम्राज्य करो ॥ स्वाभिमान पूर्ण भरो ॥ जनहृदंतरीं ॥ १ ॥ ऐक्याची महति कळो ॥ कलहबुद्धि सर्व गळो ॥ ज्ञात्यांची मति न मळो ॥ लव-हि मत्सरीं ॥ २ ॥ व्यसनीं आसक्ति नसो ॥ सद्धर्मीं भ-क्ति असो ॥ लोकनायकांत वसो ॥ कार्यचातुरी ॥ ३ ॥

**कपिंजल**—तथास्तु !

( पडदा पडतो. )

संगीत शापसंभ्रम नाटक समाप्त.

गुरुचरणार्पणमस्तु.

---

